






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

२९२६

संपादक - वा. रा. ढवळे

वर्ष ३२ अंक १२५, एप्रिल-मे-जून १९५८

वर्ष ३२ अंक १२६ जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९५८

वर्ष ३२ अंक १२७ ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर १९५८

वर्ष ३२ अंक १२८ जानेवारी-फेब्रुवारी-मार्च १९५९





महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका



संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३२, अंक १२५ एप्रिल—मे—जून १९५८

## या अंकात



संपादकीय
पत्रव्यवहाराचा पत्ता :
१२६ डी. फणसवाडी, मुंबई २.

महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, सदाशिव पेठ, पुणें २.

# साभार-स्वीकार

**१ वेगळें जग** (कथा)–गंगाधर गाडगीळ, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २; ३ रु.

**२ छळ आणि इतर कथा**–शांताराम, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २; ३ रु.

**३ भावगंध** ( टीकालेख )–मा. गो. देशमुख, विदर्भप्रकाशन, अकोला, ३।।रु.

**४ वाङ्मयाचा वाफा** ( लेख )–य. न. केळकर, डे. जिमखाना, पुणें ४; ५ रु.

**५ निसर्गोपचार–तत्वज्ञान व आचार**–अनु. भा. ल. रानडे, डॉ. म. भा. गोडबोले, ४३१ रविवार, पुणें २; ५ रु.

**६ जीवनौघ** ( कविता ) व. मा. खाडिलकर, १२८६ सदाशिव, पुणें २; १ रु.

**७ आश्विनी** (कविता)–वि.म. कुलकर्णी, व्हीनस प्रकाशन, पुणें २; २ : ७५ रु.

**८ शितू** ( नाटक )–गो. नी. दांडेकर, महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती; २ रु.

**९ ऐकलेल्या गोष्टी** ( भाग १ ते ३ )–भ. श्री. पंडित, महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती; ५० न. पै. प्रत्येकीं.

**१० नन्दी पुस्तकें** : ढवळे पॉप्युलर प्रकाशन लॅमिंग्टन रोड–मुंबई ७.

१ रामलीला : ग. म. वैद्य मूल्य १ रु.
२ रामदास : वि. वा. हडप ,,
३ डेव्हिड कॉपरफील्ड : अनु० म. वा. मराठे ,,
४ धनंजय अर्जुन : बा. वा. फाटक ,,
५ राजा शिवाजी : गो. स. सरदेसाई ,,
६ बुद्धलीला १ : धर्मानन्द कोसंबी ,,
७ चन्द्रपुरी लोककथा : वि. वा. जोशी ,,
८ धर्मशाळा : स. ना. सूर्यवंशी ,,
९ इसापनीति कथा : स. का. छत्रे ,,
१० मर्दानी झांशीवाली : विद्याधर गोखले. ,,
११ विनोबा ( विशेष प्रकाशन ) ,, प्र. के. अत्रे. ५० नये पैसे.

**११ वाकाटक नृपति आणि त्यांचा काल**–वा. वि. मिराशी, नागपूर विश्वविद्यालय, नागपूर; ५ रु.

**१२ तुकाराम महाराज यांचे संतसांगाती**–वा. सी. बेंद्रे, मौज प्रकाशन, मुंबई ४; ७।। रु.

**१३ व्यापार–परिभाषा**–वैद्य-शेजवलकर, सिटी बुकस्टॉल, पुणें २; २ रु.

**१४ अग्निजा** ( सावरकरांच्या निवडक कवितांचा संस्कृतानुवाद )–ग. बा. पळसुले, ५९३ सदाशिव, पुणें २; २ रु.

**१५ श्रीकृष्णांचा आत्मसाक्षात्कार**–नी. वि. तुळपुळे, गाणगापूर; ५ रु.

**१६ संशोधनलेखसंग्रह**–कै. द. ना. नेने, वि. सा. संघ, नागपूर १; ३ रु.

---

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३२, अंक १२५ एप्रिल–मे–जून १९५८

## संपादकीय

### मालवणचें साहित्य संमेलन

गेल्या मे महिन्याच्या ता. ४, ५, ६ या दिवशीं मराठी साहित्य संमेलनाचें ४० वें अधिवेशन मालवण येथे सुप्रसिद्ध कवि अनिल ऊर्फ आत्माराम रावजी देशपांडे यांच्या अध्यक्षतेखालीं मोठ्या यशस्वितेने पार पडलें. रत्नागिरी जिल्ह्यांत भरलेलें हें दुसरें साहित्य संमेलन. पहिलें संमेलन खुद्द रत्नागिरी येथे प्रा. ना. सी. फडके यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें होतें. या वर्षी स्पेशल बोटींचा सवलतीचा प्रवास व सिंधु-दुर्गाच्या दर्शनाचें आमिष हीं दोन मोठीं अवांतर आकर्षणें असल्यामुळे, मालवण येथे संमेलन-प्रतिनिधींची अलोट गर्दी होईल अशी रास्त अपेक्षा होती. त्या दृष्टीने संमेलनाच्या चालकांनी प्रतिनिधींच्या स्वागताची तयारीहि केली होती. पण अपेक्षेप्रमाणे गर्दी झाली नाही, तरी दिल्लीपासून अनेक ठिकाणचे साहित्यांत रस घेणारे प्रतिनिधि मालवणला आल्यामुळे, संमेलनाला एक प्रातिनिधिक स्वरूप प्राप्त झालें होतें. खुद्द मालवणकरांनीहि संमेलनाच्या सर्व कार्यक्रमांना बहुसंख्येने उपस्थित राहून संमेलन यशस्वी करण्यास साथ दिली. जमलेल्या सर्व प्रतिनिधींची राहण्याखाण्याची चोख व्यवस्था संमेलनाच्या चालकांनी शेवटपर्यंत ठेविली याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत. मालवणकरांना दुवा देतच सर्व प्रतिनिधि घरोघरीं परतले. पुढील संमेलन मिरज येथे भरण्याचें ठरलें.

### संमेलनाध्यक्ष व शाखाध्यक्ष यांचीं भाषणें

मुख्य संमेलनाला जोडून 'कथा-शाखा' व 'संकीर्ण गद्य, ललितलेखन शाखा' अशीं दोन शाखा-संमेलनें आखण्यांत आलीं होतीं तीं अनुक्रमें प्रा. वा. ल. कुलकर्णी व श्रीमती दुर्गाबाई भागवत यांच्या कुशल अध्यक्षतेने यथासांग पार पडलीं. प्रा. वा. ल. कुलकर्णी यांनी आजच्या मराठी लघुकथेची प्रकृति अनुभविक तत्त्वज्ञाच्या तरल दृष्टीने तपासून तिच्या विकासाच्या आड येणाऱ्या दोषांवर अचूक बोट ठेविलें, तर श्रीमती दुर्गा भागवत यांनी संकीर्ण ललित निबंधशाखेचें स्वरूप सोविस्तरपणाने लघुनिबंधापुरतें मर्यादित करून लघुनिबंध या वाङ्मयप्रकाराचा 'उद्गम व विकास' आपल्या अध्यक्षीय भाषणांत रेखाटला आहे. दोन्ही भाषणें इतकीं मुद्देसूद, मार्मिक, अभ्यासपरिपूर्ण व विचारप्रवर्तक आहेत की तीं अन्यत्र पूर्वींच प्रसिद्ध झालेलीं असूनहि 'पत्रिकें'त प्रसिद्ध करणें इष्ट वाटत होतें. पण जागेच्या

अनुक्रमणिका

अभावीं तो मोह आवरणें क्रमप्राप्त आहे. कथाशाखेच्या अनुषंगाने झालेली लघुकथेसंबंधींची चर्चा रंगली. विशेषतः सौ. कुसुमावती देशपांडे यांनी आजच्या प्रमुख लघुकथालेखकांच्या प्रवृत्तींची व मर्यादांचीहि जी अत्यंत मोकळेपणाने व मार्मिकपणाने सोदाहरण चर्चा केली त्यामुळे शाखाध्यक्षांच्या मूळ भाववाचक ( abstract ) व्याख्यानाच्या पार्श्वभूमीवर त्यांचें भाषण रंगत गेलें; किंबहुना असाहि अनुभव कित्येकांना आला असण्याचा संभव आहे की, कुसुमावतीबाईंनी केलेल्या स्पष्टीकरणाच्या प्रकाशांत शाखाध्यक्षांचें मूळ भाषण उठावदार आहे हें जाणवलें. दुसऱ्या चर्चेचें स्वरूपच एकसंध नसून विस्कळीत असल्यामुळे ती रंगेल अशी मुळांतच अपेक्षा नव्हती; पण तींतहि श्री. काणेकरांनी मोकळेपणाने केलेल्या आत्मवृत्त-कथनाने रस भरला.

शाखा-संमेलनाच्या संदर्भात जातां जातां एका गोष्टीचा आवर्जून उल्लेख करायला हवा. ती घटना म्हणजे कथा-शाखेच्या अध्यक्षांनी नितान्त आदरभावनेने कथा-क्षेत्रांतील सम्राट् श्री. विठ्ठल सीताराम गुर्जर हेच कथा-शाखेचे अध्यक्ष आहेत असें कल्पून त्यांनी केलेल्या कथा-वाङ्मयांतील कामगिरीचा अत्यंत समुचित शब्दांत गौरव केला ही होय. जें सहसा घडत नाहीं तें घडलें म्हणून हा उल्लेख.

## संमेलनाध्यक्षांचें भाषण

संमेलनाचे अध्यक्ष कवि अनिल ऊर्फ आ. रा. देशपांडे यांच्या वाङ्मयीन जीवनाचा परिचय मी 'पत्रिके'च्या गेल्या अंकांत थोडक्यांत करून दिला होताच. त्या जीवनाशीं सर्वथैव सुसंगत असेच विचार त्यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणांत मांडलेले आहेत. त्यांनी जें अनुभविलें व ज्या साहित्यविषयक प्रश्नांचा आजवर विचार केला त्याचा परिपाक म्हणजे त्यांचें भाषण असेंच म्हटलें पाहिजे. संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न ज्वलन्त असतांना व गेल्या वर्षींच औरंगाबाद येथे सारें साहित्य-संमेलन संयुक्तमहाराष्ट्रमय झालेलें असतां मालवण संमेलनाचे सरकारी नोकर असलेले अध्यक्ष त्या प्रश्नाची दखल कोणत्या भूमिकेने घेतात याबद्दल सर्वत्र उत्सुकता होती. पण 'साहित्य-संमेलनाच्या व्यासपीठावरून जर राजकीय प्रश्नांची चर्चा करावयाची असली तर ती साहित्यिक आणि सांस्कृतिक पातळीवरून करावी आणि ती उच्च वैचारिक श्रेणीची असावी' अशी धीरोदात्त प्रस्तावना करून 'घटक-राज्यें भाषा आणि संस्कृति यांच्या ऐक्याच्या तत्त्वावरच बनवावयास हवीं', हें आपलें मत त्यांनी स्पष्टपणाने प्रतिपादन केलें आहे. एवढ्यावरच न थांबतां त्यांनी 'महाराष्ट्रीयांनी ज्या गोष्टीसाठी मनाचा निर्धार केला ती घडून आली नाहीं, असें होत नाहीं' असेंहि खणखणावून सांगितलें आहे.

साहित्य हें संस्कृतीचें पोषण करणारें असावें, भारतीय जीवनाचा युरोपीय व अमेरिकन संस्कृतीशीं असलेला संघर्ष व त्या संघर्षाचें साहित्यांतील स्वरूप, अव्यवस्थित प्रतिभावंतांच्या निर्मितींनी अलीकडच्या साहित्यावर झालेला परिणाम, साहित्यांतील दुर्बोधता, काव्यसमीक्षेचीं मूल्यें, सौंदर्यशास्त्राच्या मर्यादा व मुक्तच्छन्दाचा प्रवर्तनहेतु वगैरे अनेक आज वादभूत झालेल्या साहित्यविषयक प्रश्नांसंबंधींचीं आपलीं स्पष्ट व निर्भीड मतें अनिलांनी आपल्या अध्यक्षीय भाषणांत मांडलीं आहेत. विशेषतः 'कादंबरी, लघुकथा आणि काव्य ह्या साहित्य-प्रकारांत विकृतीची, अस्वाभाविकतेची आणि अनृजुतेची जाणीव व्हावी, अशीं स्थळें वाढत्या प्रमाणांत दिसूं लागलीं आहेत' या त्यांच्या विचारसरणीशीं कोणीहि सुज्ञ वाचक सहमतच होईल. 'वैयक्तिक जीवानांतल्या विस्कळित संवेदनांचा चिल्लर खुर्दा चिवडीत बसणें ही जर काव्यांतील नवी टूम असली तर तेवढेंच त्यांना काव्य वाटतें आणि तिचें शब्दांशीं पोरखेळ करीत ते समीक्षणात्मक समर्थनहि करूं लागतात' हे नवकवितेचें अध्वर्युपद भूषविलेल्या अनिल कवींचे

विचार आजच्या कर्त्यांनी व टीकाकारांनी दुर्लक्षून चालणार नाहींत. मनाच्या आजच्या गोंधळलेल्या परिस्थितींत त्यांना ते खचित मार्गदर्शक व्हावेत. असे विचार स्पष्टपणाने मांडण्याचा निर्भयपणा प्रकट केल्याबद्दल अनिल अभिनन्दनास पात्र आहेत.

## मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय

मुंबईंत मराठी ग्रंथांची व वाङ्मयाची आस्थापूर्वक जोपासना करणाऱ्या व तद्विषयक चळवळींना प्रेरणा व चालना देणाऱ्या ज्या थोड्या कार्यक्षम संस्था आहेत त्यांत मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय या संस्थेचा क्रम वरच वर लागेल. ही संस्था इ. स. १८९८ सालीं श्री. पुणतांबेकर, ना. कृ. गद्रे, बाकरे, पागे प्रभृति अकरा तरुण स्वयंसेवकांनीं स्थापन केली. ही मंडळी काळाच्या उदरांत आता समाविष्ट झालेली असली तरी त्यांच्या प्रयत्नांचें मूर्त स्वरूप संस्थेच्या रूपाने आज शिल्लक राहिलेलें आहे. या संस्थेला या वर्षी ६० वर्षे पुरीं होत असून चालू वर्ष हें हीरक-महोत्सवाचें वर्ष होय. या निमित्ताने संस्थेचें सक्रिय अभिनंदन करणें हें प्रत्येक मराठी भाविकाचें कर्तव्य ठरतें.

या साठ वर्षांत संस्थेने आपल्या कार्याचा प्रचंड प्रमाणांत विस्तार केला आहे. कुर्ला ते कुलाबा या विभागांत संस्थेच्या सहा वाचनालय-शाखा असून त्या त्या शाखा वाचकांची वाचनाची वाढती भूक प्रत्यहीं भागवीत आहेत. इतकेंच नव्हे तर ही संस्था इतर वाङ्मयीन व सांस्कृतिक कार्यक्रमहि मोठ्या उत्साहाने नि आस्थेने मधून मधून साजरे करीत असते. संस्थेला अगदी मुळापासूनच उत्साही, निरलस व प्रामाणिक कार्यकर्ते मिळत गेल्यामुळे, संस्थेचा विकास सुरू आहे. मराठी भाषेचा एवढा मोठा संग्रह असणारें ग्रंथालय मुंबई राज्यांत आज तरी दुसरें नाही. या संस्थेला मुंबई नगरपालिका व मुंबई सरकार आर्थिक साहाय्य करीत असलीं तरी ही संस्था प्रामुख्याने लोकाश्रयावरच अवलंबून आहे. हीरकमहोत्सवी वर्षाच्या निमित्ताने ग्रंथसंग्रहालयाच्या कार्यकर्त्यांनी नायगांव, दादर येथें नवीन बांधावयाच्या इमारती-साठी निधि गोळा करण्यास सुरुवात केली आहे. ही संस्था महाराष्ट्राची प्रातिनिधिक असल्या-मुळे व मुंबईसारख्या राजधानीच्या ठिकाणीं कार्य करीत असल्यामुळे सबंध महाराष्ट्राने या निधीला सढळपणाने हातभार लावावा अशी विनंती करणें इष्ट वाटतें.

या हीरकमहोत्सवी वर्षाला दोन उचित अशा समारंभांनी सुरुवात झाली आहे. पहिला समारंभ श्री. चिंतामणराव देशमुख यांच्या अध्यक्षतेने झालेलें 'इतिहास संशोधन मंडळाचें' उद्घाटन. प्रा. न. र. फाटक व डॉ. पु. म. जोशी यांच्या कुशल नेतृत्वाखाली हें इतिहास संशोधन मंडळ चालणार असल्यामुळे तें उत्तरोत्तर कार्यक्षम होईल याबद्दल शंका नाही. दुसरा समारंभ एका दृष्टीने विशेष महत्त्वाचा होता. तो म्हणजे संग्रहालयाचे एक संस्थापक कै. ना. कृ. गद्रे यांची साजरी झालेली पंचविसावी पुण्यतिथि एका संस्थापक कार्यकर्त्याच्या स्मृतीचा गौरव त्याच्या पंचविसाव्या पुण्यतिथीच्या निमित्ताने संस्थेच्या हीरक-महोत्सवी वर्षांत होण्याचा योग आला ही एक औचित्यपूर्ण व शुभसूचक अशी घटना समजली पाहिजे.

## कै. ना. कृ. गद्रे

श्री. गद्रे हे जसे एक कार्यकर्ते होते त्याचप्रमाणे एक आस्थेवाईक लेखकहि होते. सरकारी नोकरींत राहूनहि त्यांनी जें केवळ हौस म्हणून लेखन केलें आहे तें जसें त्यांच्या विद्वत्तेचें निदर्शक तसेंच त्यांच्या ध्येयवादी मताचें व राष्ट्रहितबुद्धीचें द्योतक आहे यांत शंका नाही. विविध विषयांवरील स्फुट लेखांप्रमाणेच त्यांनी स्वामी विवेकानंद, प्रो. जिन्सीवाले, सर्कसवाले छत्रे यांचीं चरित्रेंहि लिहिलेलीं आहेत. पण त्या सर्वांत 'महाराष्ट्रमहोदयाचा पूर्वरंग' या पुस्तकाचा

निर्देश अवश्य केला पाहिजे. शकाब्द १२०० ते १५०० पर्यंतच्या काळांतील महाराष्ट्राचा धार्मिक, सामाजिक, राजकीय व वाङ्मयविषयक असा चतुरंग इतिहास या पुस्तकांत साम्याने समाविष्ट केलेला आहे. त्यांनी दोन ऐतिहासिक कादंबऱ्याहि लिहिल्या होत्या. त्यांपैकी 'प्याद्याचा फर्जी' ह्या कादंबरीच्या पुनर्मुद्रणाच्या प्रकाशनाचें उद्घाटन त्यांच्या २५ व्या पुण्यतिथीच्या दिवशीं करण्यांत आलें. त्या वेळेच्या सरकारी नोकरींत राहूनहि समाजसेवा, देशसेवा व वाङ्मयसेवा मोठ्या आस्थेने करणाऱ्यांचे एक प्रमुख प्रतिनिधि म्हणून श्री. गद्रे यांचें स्मरण हें केव्हाहि स्फूर्तिदायकच ठरेल.

**लोकोत्तर जीवन-यात्रेचे प्रवासी**

स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकर यांचा अमृतोत्सव सर्वत्र साजरा झाल्याबद्दल व वाङ्मयप्रभु वि. स. खांडेकर व प्राचार्य प्र. के. अत्रे यांना ६१ वें वर्ष सुरू होत असल्या-बद्दल या तीनहि लोकाग्रणींचें मनःपूर्वक अभिनन्दन करून मी त्यांना दीर्घायु चिंतितों.

सावरकर यांना गेल्या २८ मेला ७५ वर्षें संपून ७६ वें वर्ष लागलें. या निमित्ताने त्यांचा 'अमृतोत्सव' महाराष्ट्रांत व महाराष्ट्राबाहेरहि सारख्याच उत्साहाने साजरा झाला. सावरकर हे राष्ट्रीय पुढारी, वक्ते व वाङ्मयसेवक असल्यामुळे, त्यांच्या गौरवाला राष्ट्रव्यापी स्वरूप प्राप्त व्हावें हें साहजिकच होय. भारतांतील आंग्लसत्तेला आव्हान देतांना मृत्यु हा जणूं आपला जीवनसाथीच आहे हा त्यांचा विचार परिपक्व होता, हें त्यांच्या—

की घेतलें व्रत न हें अम्हि अंधतेने
लब्ध-प्रकाश इतिहास निसर्ग-माने
जें दिव्य, दाहक म्हणून असावयाचें
बुद्ध्याचि वाण धरिलें करिं हें सतीचें

या उद्गारांवरून कळून येण्यासारखें आहे. ज्या स्वातंत्र्याकरितां सावरकरांनी हें सतीचें वाण धरिलें तें स्वातंत्र्य भारताला मिळालेलें सावरकरांना 'याचि देहीं, याचि डोळां' पाहावयास मिळालें हें त्यांचें थोर भाग्यच म्हटलें पाहिजे. त्या दृष्टीने त्यांचें जीवन समृद्ध झालेलें आहे. सावरकर हे राष्ट्रीय पुढारी असले तर श्री. खांडेकर यांनी वाङ्मय–क्षेत्रांतील पुढारीपण अद्यापि कायम टेविलेलें आहे. ज्या ध्येयवादाने सावरकरांनी प्रत्यक्ष राजकारणांत उडी घातली, जवळ जवळ त्याच ध्येयवादाने प्रेरित होऊन खांडेकरांनी वाङ्मय-क्षेत्रांत संचार केला. त्यांच्या वयाला गेल्या जानेवारीच्या ११ तारखेला ६० वर्षें संपून ६१ वें वर्ष लागलें. खांडेकर हे वयाने वृद्ध होत असले तरी मनाने ते चिरतरुण आहेत, हें त्यांचें वाङ्मयच सांगूं शकेल. त्यांच्याइतका जुन्या-नव्या विचारसरणीशीं सारख्याच तन्मयतेने समरस होणारा लेखक विरळा. जीवनांतील पावित्र्य व मांगल्य यांचे ते आस्थेवाईक पूजक आहेत. त्यामुळे त्यांचें समग्र वाङ्मय हें उदात्त व ध्येयदर्शी झालेलें आहे. खांडेकरांच्याप्रमाणेच आचार्य अत्रे यांनी शिक्षक म्हणूनच जीवनयात्रेला सुरवात केली. पण मार्ग अगर साधनें कोणतीहि असोत सारखें पुढे पुढे जायचें या त्यांच्या व्यक्तित्वाच्या वैशिष्ट्यामुळे ते वाङ्मय व राजकारण या दोन्हीहि क्षेत्रांत चमकले आहेत. एकाची त्यागी वृत्ति तर दुसऱ्याची भोगी. लेखणी व वाणी यांचा प्रभाव किती क्रांतिकारक असतो हें अत्रे यांनी संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळींत सिद्ध केलेलें आहे. अत्रे यांना येत्या १३ ऑगस्टला ६० वर्षें संपून ६१ वें वर्ष लागत आहे. या तीनहि लोकाग्रणींनी मराठी वाङ्मयाची जी अमूल्य सेवा केलेली आहे तिच्याबद्दल मराठी भाषिकांनी त्यांचे कायमचे ऋणी राहिलें पाहिजे. ● ● ●

वा. रा. ढवळे

कृ. पां. कुलकर्णी

# समर्थभक्त शंकर श्रीकृष्ण देव

( व्यक्ति व वाङ्मय )

## प्रणामाञ्जलि

### १. शंकररावजी देव–एक प्रभावी व्यक्ति

समर्थभक्त शंकररावजी देव हे समर्थस्वरूपीं विलीन झाले. त्यांच्या जाण्याने महाराष्ट्रांतील एक अत्यंत साक्षेपी संशोधक नाहीसा झाला. एक प्रभावी वक्ता गेला. मराठी वाङ्मयाचा एक निष्ठावन्त जाणकार गेला. गेल्या पिढींतील एक प्रभावी दुवा तुटला. जीवनध्येय त्यांनी प्राप्त करून घेतलें; त्यांचें समाधान झालें, परंतु महाराष्ट्राची विशेषतः मराठी वाङ्मयाची कधी भरून न येणारी अशी हानि झाली. मोठमोठीं माणसें जातात, परंतु त्यांच्या जागा भरून निघत नाहीत, निदान त्यांच्या तोलाने त्या भरून जात नाहीत. डॉ. भांडारकर गेले; उच्च सर्जनात्मक संशोधन पोरकें झालें. न्यायमूर्ति रानडे गेले; राष्ट्रोद्धाराच्या सर्व शाखांतील मार्गदर्शन खंडित झालें. लोकमान्य टिळक गेले; वैदिक वेदाङ्गज्योतिष ह्यांच्या संशोधनांत खंड पडला. भारताचार्य चिंतामणराव वैद्य गेले व त्यांच्याबरोबर महाकाव्येतिहासाच्या सूक्ष्म अभ्यासाला ओहोटी लागली. इतिहासाचार्य राजवाडे गेले; त्यांच्याबरोबर अध्ययनाची स्फूर्ति गेली. ज्वलन्त विचिकित्सा गेली, तिचा चौफेरपणा नाहीसा झाला. विनायकराव भावे, डॉ. केतकर, श्री. पांगारकर, श्री. दसरी अशीं किती तरी नांवें घ्यावीं ! हीं विद्वान् माणसें गेलीं व मराठी वाङ्मयाच्या उच्च अभ्यासांत पोकळी निर्माण झाली. ही पोकळी उत्तरकालीनांकडून भरून काढण्याचा प्रयत्न होत असला तरी त्यांच्या तोलाने, त्यांच्या मानाने ती भरली जात नाही हें तितकेंच खरें आहे. अशी पोकळी निर्माण करून ठेवून गेलेल्यांपैकी श्री. शंकररावजी देव हे एक मुख्य होत.

### २. हस्तलिखिताशीं त्यांचें तद्रूपत्व

श्री. शंकररावजींचें मरणसमयीं वय सत्याऐंशी वर्षांचें होतें. त्यांचा जन्म १८७१ इसवी सालचा व त्यांचा मृत्यु १९५८ च्या एप्रिलच्या तेवीस तारखेचा. तसा त्यांचा मृत्यु अकस्मात् झाला असें नाही. गेलीं दोन-तीन वर्षे त्यांची स्थिति तर असहायच होती. एऱ्हवी शरीरप्रकृति चांगली परंतु स्मरणशक्ति हतबल झाल्यामुळे एकंदरींत अवस्था कारुण्यपूर्णच दिसत असे. एका क्षणापूर्वी सांगितलेली गोष्ट विसरून जाऊन पुनः त्याच गोष्टीबद्दल ते पुनः प्रश्न करीत. त्यांच्याशीं बोलण्यास व त्यांची समजूत घालण्यास पुष्कळ सायास होत. लौकिक व्यवहाराच्या बाबतींत अशी कींव येण्यासारखी त्यांची स्थिति झाली असली तरी 'समर्थ वाग्देवता मंदिरां'तील एखाद्या हस्तलिखित पोथीचा क्रमांक कोणता, तिचें स्थान कोणतें, तिचा कोणीं कोणीं आजवर उपयोग केला व कसा कसा केला, ह्यासंबंधींच्या स्मृति त्यांच्यापुढे तत्काल उभ्या राहत व त्याबद्दल आश्चर्य वाटल्याखेरीज राहत नसे. लौकिक व्यवहार क्षणाक्षणाला पुसला जात असला

तरी तो प्रकार हस्तलिखित पोथ्यांसंबंधी नव्हता; इतकी त्यांची बुद्धि हस्तलिखितांशीं तद्रूप झाली होती. त्या स्मृतिभ्रंशाचा त्रास त्यांना स्वतःला निश्चित होत असावा हें मात्र खास.

## ३. समर्थसेवेचें बाळकडू

श्री. शंकररावजींची उभी हयात सत्त्याऐंशी वर्षांची. हिच्यापैकीं त्यांना समजूं लागण्यापूर्वींचीं कांहीं थोडीं वर्षे वजा करून बाकीची त्यांची सर्व हयात श्रीसमर्थांच्या दर्शनांत, स्मरणांत व चिंतनांत गेली. त्यांच्या मातोश्री जेव्हा सज्जनगडीं जात तेव्हा त्या लहान शंकरला आपल्याबरोबर घेत. तेथील रामसोहळा वारंवार नजरेस पडल्यामुळेच कदाचित् समर्थसेवेचें बाळकडू त्यांना मिळालेलें असावें. हाच मूळचा अंकुर. घरांत नित्याच्या पठनांत मनाचे श्लोक, करुणाष्टकें, दासबोधाच्या ओव्या असल्यामुळे जे संस्कार त्यांच्या बालपणीं त्यांच्या मनावर झाले, त्यांमुळेच त्या अंकुराचा पुढे इतका मोठा विस्तार झाला. शाळेंत ते वक्तृत्वाच्या स्पर्धेत भाग घेत व बक्षिसेंहि मिळवीत. हायस्कूलमध्ये असतांनाच शास्त्रीबुवांची निबंधमाला त्यांच्या वाचनांत आली. त्या भाषेसारखी भाषा आपणास लिहितां यावी, आपणासहि तसे निबंध लिहितां यावेत म्हणून त्यांनी निबंधमालेंतील कांहीं भाग तोंडपाठ केला होता. शंकररावजींची भाषा आपण वाखाणतों त्याचें मूळ हें येथे सापडतें. त्यांच्या स्वदेशप्रीतीचें, स्वसंस्कृतीचें, देशाच्या उन्नतीच्या तळमळीचेंहि पण बीज येथेच आहे. वयाच्या सोळाव्या वर्षी ते पुण्यास कॉलेजमध्ये गेल्यावर लो. टिळकांशीं ओळख करून घेऊन ते त्यांच्याकडे जाऊं येऊं लागले. केसरीमध्ये कांहीं लेखन करण्याचेंहि त्यांच्याकडून प्रोत्साहन मिळूं लागलें. कॉलेजजीवनांत पुणें येथील एकंदरींत सांस्कृतिक परिस्थितीचा त्यांच्यावर फार परिणाम झाला. सुट्टींत धुळ्यास आल्यावर येथे आपणहि पुण्यासारखें कांहीं करावें असें त्यांना वाटूं लागलें. आपल्या समवयस्कांचा त्यांनी विचार घेतला.

## ४. सत्कार्योत्तेजक सभेची स्थापना

त्यांतूनच पुढें धुळ्याची प्रसिद्ध 'सत्कार्योत्तेजक सभा' निर्माण झाली (१९-५-१८९३). उद्देश प्रथम लहानच होता. मे महिन्याच्या सुट्टींत विद्यार्थ्यांचीं व्याख्यानें करावयाचीं. कधी जुळलें तर वकिलांचींहि सभेमार्फत व्याख्यानें होत. असा हा मर्यादित कार्यक्रम दोन-तीन वर्षे चालला. परंतु त्याच्यांतहि विघ्न आलें. सत्त्याण्णव सालीं लो. टिळकांना शिक्षा झाली. श्री. शंकररावजी पडले टिळकानुयायी. साहजिकच सत्कार्योत्तेजक सभेची व्याख्यानमाला ओसरूं लागली. उपस्थिति फार झाली तर पांचपंचवीस विद्यार्थ्यांचीच. वक्ताहि पण कोणीतरी विद्यार्थीच. फार फार झालें तर एखादा नवशिका वकील. पण अशीहि रोडावलेली स्थिति पुढे दोन वर्षे चालली. नव्याण्णव सालीं शंकररावजींची वकिलीची परीक्षा झाली व ते वकिली करूं लागले. व्यवसायामुळे इतर पुष्कळांच्या ओळखी झाल्या. सत्कार्योत्तेजक सभेच्या स्थापनेच्या वेळचे देशपांडे, माचवे वगैरे वकील स्नेही होतेच. त्यांच्याच जोडीला श्री. भास्कर वामन भट, गोविंद कृष्ण चांदोरकर, विष्णु सिताराम रणदिवे वगैरे मंडळी येऊन मिळाली. रोडावलेली सत्कार्योत्तेजक सभा पुनः तरारली. व्याख्यानमालेला पुनः चांगलें स्वरूप आलें. उद्देश मात्र तोच राहिला. व्याख्यानें करविणें, प्लेगच्या दिवसांत गांवाबाहेरच्या वस्तींत मित्रांनी संध्याकाळीं फुरसतीच्या वेळीं एकत्र जमून दासबोध, संतविजय, भक्तलीलामृत वगैरे ग्रंथांचें वाचन करणें, कांहीं चर्चा करणें. हाच उद्देश सन १९०२ सालापर्यंत चालला. सत्कार्योत्तेजक सभेचें हेंच पहिलें स्वरूप.

### ५. संस्थेच्या स्वरूपांत बदल

परंतु पुढच्याच वर्षीं एक चांगला सुयोग आला व त्याने सत्कार्योत्तेजक सभेचें स्वरूपच पालटलें. व्याख्यानांचें तिचें स्वरूप जाऊन तिला संशोधनाचें व तेंहि रामदासी संशोधनाचें स्वरूप प्राप्त झालें. प्रतिवर्षी श्री. देव, भट, रणदिवे वगैरे मंडळी सज्जनगडीं समर्थांच्या दर्शनास जात. सन १९०३ सालीं तसे ते गेले. तेव्हा त्यांना कळलें की श्रीमद्दासबोधाची एक जुनी हस्तलिखित प्रत श्री. राजवाडे ह्यांच्याजवळ आहे. त्याच्याबरोबर आणखीहि कांही रामदासी वाङ्मयाचीं बाडेंहि त्यांच्याजवळ आहेत. राजवाडे ह्यांचें साधनांचें संशोधन चालू होतेंच. संशोधनांत जीं कांही साधनें हाताशीं येत—मग तीं ऐतिहासिक असोत अथवा वाङ्मयीन असोत,—तीं सर्व ते संग्रहून ठेवीत. ह्याच साधनांत एक दासबोध व समर्थशिष्य गिरिधर ह्याच्या ग्रंथांचीं बाडें त्यांना मिळालीं. श्री. शंकररावजींच्या एकंदर संशोधनतत्परतेकडे त्यांनी पाहिलें व त्यांच्या हवालीं तें सर्व रामदासी दप्तर मुद्दाम कोल्हापुराहून सातान्यास येऊन राजवाड्यांनी केलें. समक्ष भेटींत दासबोध अस्सलबरहुकूम तीन वर्षांच्या अवधींत छापण्याचें श्री. शंकररावजींनी राजवाड्यांना आश्वासन दिलें. राजवाडे-देव ह्यांची ही भेट व रामदास–रामदासी वाङ्मयाची ही प्राप्ति ह्या दोन गोष्टी सत्कार्योत्तेजक सभेला संशोधनाचें स्वरूप देण्यास कारणीभूत झाल्या. ह्याला विकसित, भरदार व अतुलनीय स्वरूप कसें उत्तरोत्तर प्राप्त होत गेलें, हा गेल्या पंचावन्न वर्षांचा इतिहास आपणांसमोर आहेच.

### ६. कल्याणस्वामींचा दासबोध

राजवाड्यांनी दिलेली व शंकररावजींनी छापण्याची हमी घेतलेली प्रत त्या मुदतींत अखेर छापली गेलीच नाही. मध्यंतरीं त्यांना ह्या प्रतीपेक्षाहि अस्सल प्रत समर्थशिष्य कल्याणस्वामींच्या डोमगांवच्या मठांत पूजेंत असलेली आढळली व त्यांनी ती अस्सल बरहुकूम नकलून घेतली व छापून काढली. हाच सत्कार्योत्तेजक सभेच्या रामदास आणि रामदासी मालेचा पहिला ग्रंथ होय आणि हा १९०५ च्या दसऱ्यास प्रसिद्ध झाला. ह्या ग्रंथाला शंकररावजींनी जी विवेचक प्रदीर्घ प्रस्तावना जोडली आहे ती मूळ ग्रंथाच्यासारखीच महत्त्वाची आहे. दासबोध, श्रीसमर्थ व समर्थ-संप्रदाय ह्यासंबंधीची जागृति महाराष्ट्रांत राजवाडे ह्यांनी 'समर्थ रामदास' हा निबंध लिहून अगोदरच केली होती. दासबोधाच्या ह्या प्रकाशनाने त्यांत भर पडून रामदासी वाङ्मयाकडे लोकांचीं मनें विशेषच आकर्षिलीं गेलीं. ह्या वाङ्मयाच्या प्रसारासाठी पुढे शंकररावजींनी ' रामदास आणि रामदासी ' हें मासिक सुरू केलें. ह्या मासिकाच्या द्वारा त्यांनी आजपर्यंत रामदासी वाङ्मयाचे एकंदर पंचाहत्तर ग्रंथ म्हणजे जवळजवळ २५ हजारांवर पृष्ठें छापून काढलीं. ह्या सर्व संभाराचा पाया मात्र डोमगांव मठांतील श्रीकल्याणस्वामींनी लिहिलेला व श्रीसमर्थांनी त्यांत स्वहस्तें शोध घातलेला दासबोध हा होय.

### ७. भा. इ. सं. मंडळाशीं संबंध

ह्याच सुमारास कांही आगेमागे पुणें येथे भारत-इतिहास-संशोधन-मंडळाची स्थापना झाली. त्याच्या पूर्वीपासून राजवाडे मराठा इतिहासाच्या व वाङ्मयाच्या साधनांचें संशोधन करीतच होते. त्यांनी ऐतिहासिक साधनांचे कांही आरंभाचे खंड प्रकाशितहि केले होते. ह्या साधनांचा चांगला संग्रह व्हावा, तो सुरक्षित राहावा, त्याच्यावर चर्चा व्हाव्यात, शोधनिबंध लिहिले जावेत व त्यांचें संपादन-प्रकाशन व्हावें ही त्यांची फार इच्छा होती. त्या दृष्टीने राजवाड्यांनी सरकारांत व विद्वानांत प्रतिष्ठा असलेल्या विद्वानांशीं बोलणींहि चालविलीं होतीं. शेवटीं रावबहाद्दूर जोशी, साने, सरदार मेहेंदळे वगैरे मंडळींच्या विचाराने व सहकार्याने

अनुक्रमणिका

इ. स. १९१० च्या आषाढ शुद्ध प्रतिपदेस त्यांनी भा. इ. सं. मंडळाची स्थापना केली. धुळें येथील देव, भट, चांदोरकर वगैरे सत्कार्योत्तेजक सभेच्या मंडळींशीं त्यांचा परिचय झाला होताच. तेव्हा त्यांनी ह्या सर्वांना मंडळास येऊन मिळण्याचा आग्रह केला. ते मंडळाचे सभासदहि झाले व त्यांच्या प्राच्य विद्येच्या सर्व अंगांच्या संशोधनाच्या जोरावर ते प्रामुख्याने भाग घेऊं लागले. मंडळाचें कार्यहि मोठ्या द्रुतगतीने चालू लागलें. पहिल्या पांच वर्षांतच निरनिराळ्या सभासदांनी निरनिराळ्या विषयांवर वाचलेल्या निबंधांची संख्या साडेपांचशेंवर गेली. खुद्द राजवाड्यांनी तर दोनशें शोध-निबंध मंडळांत वाचले. मंडळाच्या आरंभाच्या दिवसांत त्याचा आयव्यय बेताचाच होता. वाचलेल्या निबंधांचें प्रकाशन त्यामुळे दिरंगाईवर जर पडलें तर त्यापुढे चालकांचा इलाज नव्हता. लेखकाची तर इच्छा असायची की आपलें संशोधन लवकर उजेडांत यावें. राजवाड्यांची तर कुचंबणा त्यामुळे फारच होऊं लागली. त्यांत पुनः मंडळाच्या जमाखर्चपत्रकाबद्दलच्या तक्रारींची भर पडली. मंडळ म्हणजे एक संस्थाच. संस्था आली की तिच्याबरोबर बिनावेतन काम करणारे आलेच. त्याबरोबर कामाची ढिलाई आलीच. ह्या गोष्टी राजवाड्यांच्यासारख्या निःस्पृह माणसाला कशा पटणार? तक्रारी सुरू झाल्या. वार्षिक सभेंत मतभेद उमटूं लागले. सभासदांत तट पडले. ह्या सर्व प्रकारांतून संशोधकांमध्ये पुणेकर व धुळेकर असे दोन पक्ष झाले. धुळेकर मंडळीचें पुढारीपण अर्थात् राजवाड्यांकडे आलें व बाकीचे धुळेकर—देव, चांदोरकर, भट वगैरे त्यांच्या मताला रुकार देऊं लागले. शोध-निबंधांच्या प्रकाशनांत होणारी दिरंगाई टाळण्यासाठी धुळेकर मंडळींनी कांही काळ प्रकाशनाचें काम आपल्या अंगावर घेतलें. पण मंडळ पुण्यास व प्रकाशन धुळ्यास असें असल्यामुळे तेंहि नीट चालेना. त्यांत पुनः आणखीहि कांही कारणांची भर पडली. शोध-निबंधांतील नव्या मजकुराने कांहींचीं मनें दुखावलीं गेलीं. क्रियेला प्रतिक्रियाहि सुरू झाली. अशा कांही गोष्टी झाल्या खऱ्या. त्याचा परिणाम मात्र धुळेकरांचा व विशेषतः राजवाड्यांचा भा. इ. सं. मंडळाशीं असलेला संबंध दूरावण्यांत झाला. मंडळाच्या चालकांनी त्यांच्या विनवण्याहि खूप केल्या; परंतु दूरावलेला संबंध पुनः पहिल्यासारखा मात्र झाला नाही.

### ८. इतिहास व ऐतिहासिक

ह्यांतूनच पुढे १९१६ सालीं 'इतिहास आणि ऐतिहासिक' ह्या मासिकाचा जन्म झाला. श्री. शंकररावजींनी राजवाडे ह्यांच्या शोध-निबंधांच्या त्वरित प्रकाशनाची जबाबदारी आपल्या अंगावर घेऊन हें मासिक सुरू केलें. 'संस्कृत भाषेचा उलगडा' हा त्यांचा प्रसिद्ध निबंध ह्याच मासिकांत प्रसिद्ध झाला. सत्कार्योत्तेजक सभेचा आणि राजवाडे ह्यांचा संबंध ह्याच्या पूर्वीच त्यांच्या ज्ञानेश्वरीच्या पाटांगण प्रतीच्या प्रकाशनाने घनिष्ठ झाला होताच. पुढे त्यांत पुनः त्यांच्या 'ज्ञानेश्वरीचें व्याकरण', 'नववा अध्याय' वगैरे प्रकाशनांची भर पडली. पुढे पुढे तर तो संबंध अगदी घरोब्याचा झाला. धुळेकर मंडळीहि कांही कमी कर्तबगार नव्हती. साधनें गोळा करणें, शोधनिबंध लिहिणें, त्यांचें त्वरित प्रकाशन करणें, त्यासाठी निधि जमविणें वगैरे संस्थास्थापनेस जरूर लागणाऱ्या गोष्टींत ते चांगले वाकबगार होते. श्री. शंकरराव देवांनी सत्कार्योत्तेजक सभा तर स्थापिलीच, पण पुढे 'समर्थवाग्देवतामंदिर' उभारलें. श्री. भास्करराव भटांनी 'राजवाडे संशोधन मंडळ' उभारलें. श्री. गोविंद कृष्ण चांदोरकरांनी एखादी संस्था जरी स्थापिली नाहीं, तरी त्यांनी प्राच्य विद्येच्या अनेक अंगांत संशोधन केलें, व तेंहि सूक्ष्म विचिकित्सेने केलें. त्यांची संशोधन-दृष्टि मोठ्या अव्वल दर्जाची होती. सत्कार्योत्तेजक सभा म्हणजे धुळ्याचें एक भूषण झालें.

## ९. सदस्यांचा घरोवा

सभेचे सर्व सदस्य संध्याकाळीं एकत्रत्र फिरावयास निघत. पांजरा नदीच्या कांठीं एकत्रच बसत. त्यांच्या चर्चा चालत; नवीन उपक्रम निघत; त्यांचे वादविवाद होत; वादांत मतभेद उत्पन्न होत; त्यामुळे कधी कधी रुसवेफुगवे होत. रामदास व इतर साधुसंत ह्यांच्या कार्यासंबंधी एकदा वाद झाला. त्याची पराकोटि झाली. राजवाड्यांनी त्यांत एकान्तिक व आग्रही मत प्रतिपादिलें. चांदोरकर चिकित्सक खरे, पण किंचित् भावनाप्रधान होते. ते त्या मताने दुखविले गेले. अबोला झाला. परंतु तितक्यांत तितकाच. असे प्रसंग उद्भवत, नाही असें नाही. परंतु त्यांनी कधी कायमची वितुष्टता निर्माण झाली नाही. प्रत्येकाच्या कार्याचें महत्त्व प्रत्येकजण ओळखीत असे. प्रथम प्रथम राजवाडे, देव, चांदोरकर, भट हे चौघेच त्यांत असत. कधी कधी जावडेकर, रणदिवे वगैरे मंडळीहि येत. पुढे केशवराव ओगले, खुपेरकरशास्त्री, निजसुरे, त्रिंबकराव कुलकर्णी व प्रस्तुत लेखकहि कधी कधी जाऊन त्या मंडळींत मिळत. नदीकांठच्या ह्या गप्पा किंवा वाङ्मयीन चर्चा फारच रंगत. ती एक वाङ्मयीन मेजवानीच असे. पुढे ज्या संस्था धुळ्यास स्थापिल्या गेल्या त्यांचे सर्व आराखडे पांजरा नदीच्या काठींच आखण्यांत आले.

## १०. रामदास व रामदासी संशोधन

श्री. शंकरराव देव ह्यांनी समर्थ व समर्थसंप्रदायाच्या वाङ्मयाच्या प्रसारासाठी इ. स. १९१५ सालीं ' रामदास व रामदासी ' हें मासिक सुरू केलें. त्यासाठी ' आत्माराम छापखाना ' तयार केला. साधनांच्या संपादनाची सर्व जबाबदारी शंकररावजींवर व छापून काढण्याची सर्व जबाबदारी विष्णुपंत रणदिवे व जावडेकर ह्यांच्यावर होती. ह्या मासिकाने वाङ्मयसंभारहि कांही कमी प्रकाशित केला नाही. पंचवीस हजारांवर पृष्ठें छापून काढलीं. पंचाहत्तरांवर ग्रंथ प्रकाशित केले. ही कांही थोडी कमाई नव्हे. ह्या मासिकांत नेहमीचीं सदरें म्हटलीं म्हणजे रामदासी संशोधन, ऐतिहासिक टिपणें व कागदपत्रें, सांप्रदायिक वृत्त, चर्चा, जीर्णोद्धाराची माहिती, शिवाय एखाद्या महत्त्वाच्या रामदासी ग्रंथाचें खंडशः अनुस्यूत प्रकाशन हीं असत. ह्या मासिकाच्या द्वारा स्वानुभवदिनकरासारखा व समर्थप्रतापासारखा-प्रतिदासबोधासारखे ग्रंथ प्रकाशित झाले. दासविश्रामधाम म्हणजे रामदासी संप्रदायाचा एक विश्वकोशच. गीतार्णवासारखा हा प्रचंड ग्रंथ ह्याच मासिकांत प्रसिद्ध झाला. ह्याशिवाय समर्थांचीं दोन चरित्रें, रामदासांच्या कवितांचे भाग, मनाचे श्लोक, श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, करुणाष्टकें, भक्तमंजरीमाला ( शिवरामस्वामीकृत ), श्रीदिनकराचे स्फुट कवितांचे भाग, मेरुस्वामीचा रामसोहळा, भीमोपदेश, वेणीगिरीधरकृत संकेतरामायण, श्रीहकीकत वाके, सीतास्वयंवर, गिरिधराचीं सुंदर व मंगल रामायणें, श्रीसमर्थकृत पदपदांतरें, रामदासपंथक्रमसार, श्रीसमर्थांचीं लघुकाव्यें-अशीं किती नांवें सांगावींत-हे सर्व ग्रंथ शंकररावजींनी मोठ्या साक्षेपाने, निष्ठेने व आस्थेने संपादन करून प्रकाशित केले. केवढें हें प्रचंड कार्य ! ज्याप्रमाणे इतिहासभक्ताला राजवाड्यांच्या साधनांचे खंड किंवा भा. इ. सं. मंडळाच्या मासिकांचे खंड किंवा वाङ्मयभक्ताला ज्याप्रमाणे पांगारकरांच्या ' मुमुक्षु 'चे खंड किंवा आजगांवकरांच्या कविचरित्रांचे खंड उपयोगीं पडतात त्याप्रमाणे मराठी वाङ्मभक्ताला ' रामदास व रामदासी ' मासिकाचे खंड उपयोगीं पडतात. रामदासी सांप्रादायिकाला तर हे विशेषच अपूर्वाईचे वाटल्यास त्यांत नवल कसचें ?

## ११. समर्थ-चरित्र

ह्या सर्व रामदासी वाङ्मयाचा परिपाक श्री. शंकररावजींनी जें त्रिखंडात्मक रामदास-चरित्र लिहिलें त्यांत उतरला आहे. समर्थांचें हृदयच त्यांत उकलून दाखविलें आहे. समर्थ-

संप्रदायाचा विस्तार त्यांत आहे. श्री. शंकररावजींची दासबोधाची प्रस्तावना तर प्रसिद्धच आहे. लेखनाच्या पहिल्या ऊर्मीमध्ये त्यांनी 'जपानची मर्दुमकी' सारखें कांही सामान्य लेखन केलें. परंतु पुढे मात्र समर्थ व सामर्थिक वाङ्मयच आरंभीं, शेवटीं व मध्येहि सारखें आपणांसमोर ठेविलें. तोच एक ध्यास त्यांनी घेतला. ध्यानीं, मनीं, चिंतनीं अष्टौप्रहर तेंच एक समर्थ व सामर्थिक वाङ्मय पुढे असल्यामुळे त्याच्या वाचनाचा परिणाम त्यांच्या वाणीवर व वर्तनावर झाला असल्यास त्यांत आश्चर्य नाही. शंकररावजींची वाणी अत्यंत स्पष्ट, शुद्ध व रसाळ असे. त्यांच्या वक्तृत्वांत मोठें सामर्थ्य होतें. श्रोत्यांवर त्यांची छाप तेव्हाच पडे. समर्थकार्यासाठी द्रव्यसाहाय्य मिळविण्यांत त्यांनी आपल्या वक्तृत्वाचा उपयोग केला. ते श्रोत्यांच्या हृदयालाच हात घालीत व व्याख्यानाच्या शेवटीं देणग्यांचा पाऊसच पडे. संतवाङ्मयाच्या चिरंतन अभ्यासाने त्यांची वाणी तशीच सामर्थ्यवान् झाली होती. कधी कधी व्याख्यानांत कृत्रिमता भासे, नाही असें नाही; परंतु एकंदरींत व्याख्यानहि रसाळ व लेखनहि रसाळ. भावनामय लेखनशैलीचे ते उत्तम नमुनेच असत.

## १२. समर्थ-वाग्देवता मंदिर व इतर कार्यें

रामदासी वाङ्मयाचीं साधनें गोळा करण्यासाठी श्री. शंकररावजींनी ठिकठिकाणीं दौरे काढले. संशोधनासाठी त्यांनी पुष्कळ पायपिटी केली. परळी सज्जनगडावर व चाफळास त्यांची नेहमी फेरी असे. जांब हेंहि त्यांच्या नित्याच्या भेटीचें ठिकाण असे. ह्याशिवाय समर्थांनी जेथे जेथे मारुतीची स्थापना केली तेथे तेथेहि ते जात असत. रामदासी मठहि त्यांच्या भेटींतून सुटले नाहीत. ह्या सर्व ठिकाणांहून संशोधन करून जो अमोल वाङ्मयठेवा त्यांनी जमा केला, त्याच्या संरक्षणासाठी त्यांनी 'समर्थ वाग्देवता मंदिर' स्थापलें ( १९३५ ). ह्या मंदिरांत तीनचार हजारांवर बहुमोल हस्तलिखितें त्यांच्या वर्णनात्मक फेरिस्तांसह संग्रहित केलीं आहेत. श्री. शंकररावजी नेहमी मोठ्या अभिमानाने सांगत की कोणाहि प्राचीन मराठी वाङ्मयसंशोधकाला 'समर्थ वाग्देवता मंदिरा'कडे धाव घ्यावीच लागेल. त्याशिवाय त्याच्या संशोधनाची परिपूर्ति होणारच नाही; इतका अमोल तो संग्रह आहे. ह्या मंदिराशिवाय त्यांनी कितीतरी रामदासी मठांचा व मंदिरांचा जीर्णोद्धार केला. जांबेचें समर्थमंदिर हें तर त्यांच्या श्रमाचेंच फल होय. त्याशिवाय मसूर, शहापूर, शिवथर ह्या ठिकाणीं असलेल्या हनुमन्मंदिरांचाहि त्यांनी जीर्णोद्धार केला. ह्या संस्था झाल्या. ह्याशिवाय १९३९ सालीं समर्थसेवेसाठी 'समर्थसंघ' त्यांनी स्थापिला. बृहन्महाराष्ट्रांत ह्या संघाच्या एकंदर अठेचाळीस शाखा आहेत.

## १३. शंकररावजींचें शिस्तबद्ध जीवन

कार्याचा हा सर्व खटाटोप जीवन शिस्तबद्ध केल्याशिवाय उरकावा कसा? ह्यासाठी शंकररावजींनी आपलें सर्व जीवन शिस्तबद्ध केलें होतें. त्यांना संसार होताच. ते वकिलीचा व्यवसाय करीत. परंतु वकिलीमध्ये त्यांनी कांही पथ्यें पाळलीं होतीं. खोटा खटला हातीं घ्यायचाच नाही. खटला घेतला तर मुख्य न्यायाधिशाच्या पुढे चालला जाणाराच फक्त घ्यायचा. अपिलें तेव्हढींच फक्त चालवायचीं. खालच्या कोर्टांत कधी जायचें नाही. अपिलांचें कामहि फक्त दोन वाजेतोंपर्यंतच चालवावयाचें. दोन वाजले की साधारणपणें ते परत घरीं येत व आपल्या वाचनलेखनाला लागत. ते लो. टिळकांचे अनुयायी असल्यामुळे राष्ट्रीय राजकारणांत असत. म्युनिसिपालिटीच्या कामांत ते फारसे पडत नसत. 'स्वराज्याच्या' स्वराज्याबद्दल त्यांना तिटकाराच असे. परंतु मित्रांच्या सांगण्यावरून व राष्ट्रीय-नेमस्त ह्या पक्षभेदामुळे एकदा त्यांत ते पडले व शिक्षणसमितीचे अध्यक्षहि झाले. लो. टिळकांच्या मृत्यूनंतर ते इतर राष्ट्रीय

पक्षीयांच्या बरोबर महात्मा गांधीजींच्याहि राजकारणांत पडले. मुंबई प्रांताच्या विधानसभेचे सभासद म्हणूनहि ते निवडून आले व तेंहि शासनिक कार्य त्यांनी केलें. परंतु पिंडच वाङ्मयी, संशोधकी व भाविक पडल्यामुळे, व दुसऱ्याहि कारणांनी त्यांनी राजकारणाचा नाद सोडून वाङ्मयीन व्रतच पुढे चालविलें. पुष्कळांना जीवन असतें पण जीवनध्येय नसतें; जीवनध्येय असलें तरी तें पार पाडण्याची चिकाटी नसते. त्यांच्यांत प्रयत्नांचें सातत्य नसतें. शंकररावजींना जीवनध्येय होतें. तें त्यांनी निश्चित केलें होतें. तें सिद्धहि त्यांनी केलें व सिद्ध झालेलें त्यांनी पाहिलेंहि. हेंच त्यांचें सुख व हेंच त्यांचें समाधान.

## १४. त्यांचें व्यक्तित्व

शंकररावजींचा व प्रस्तुत लेखकाचा परिचय १९१७ सालीं झाला व तो गु. विसुभाऊ राजवाडे ह्यांच्या मार्फत झाला. तो कांहीतरी जानेवारी महिन्यांतील दिवस असावा. त्या दिवशीं सुट्टी होती. दोन प्रहरची वेळ होती. राजवाड्यांशीं कांहींतरी माझें बोलणें चाललें होतें. कांही तरी चर्चा चालली होती. मध्येच राजवाडे म्हणाले की, ' आज शंकरराव येणार आहेत. तुमची त्यांची ओळख झालेली बरी. तुम्ही नवीनच येथे आहांत. कांही तरी काम करण्याचें म्हणताहात. तेव्हा त्यांची गांठ पडावी म्हणून आज मी त्यांना मुद्दाम बोलावलें आहे ' इतक्यांत प्राणिसंरक्षणगृहाच्या दुसऱ्या मजल्यावर पावलें वाजतांना ऐकूं आलीं आणि शंकररावजी एकदम वर आमच्यासमोर येऊन उभे राहिले. ती उंचीपुरी यष्टि, तें सडपातळ, निर्वात परंतु भरदार आणि ताठ शरीर, तो तेजस्वी, गोरा चेहरा, ते चष्म्याच्या आंतील पाणीदार डोळे, ती निश्चयी मुद्रा, ते ठाम, स्पष्ट, शुद्ध, सुटसुटीत बोलणें, तो पांढरा स्वच्छ अंगरखा, तें टिळक वळणाचें घेतलेलें शुभ्र उपरणें, तितकेंच शुभ्र तें नेसूं धोतर व डोक्यावरील रुमाल-अशी व्यक्ति पाहून मी तर वचकलोंच. परंतु पुढे आर्जवी व प्रेमळ स्वरांत त्यांचें बोलणें सुरू झालें व एकदम नूर पालटला. राजवाड्यांनीं माझी ओळख करून दिली की, " हे आपल्यापैकीच परंतु वयाने सर्वांत लहान आहेत. कांही काम करावें म्हणतात, " वगैरे वगैरे. शंकररावजींचा माझा परिचय असा झाला. राजवाडे ह्यांच्या धातुकोशाच्या संपादनाच्या निमित्ताने तो परिचय दृढ होत गेला. त्या कामाच्या बाबतींत मतभेदहि झाले. परंतु धातुकोशाचें संपादन यशस्वी रीतीनें पार पडलें. मतभेद दुसऱ्याहि एका वाङ्मयीन बाबतींत झाले. ते वाढले व वाढविले गेलेहि. ते विकोपालाहि गेले ! परंतु शंकररावजींच्या पर्वताएवढ्या प्रचंड कार्यापुढे मतभेदाचें काय होय किंवा त्या विकोपाचेंहि काय होय ! अखेर त्यांच्याबद्दलची श्रद्धाच राहते; त्यांच्याबद्दलचा आदरच राहतो.

## १५. त्यांचें महाराष्ट्रावर ऋण

समर्थ वाग्देवता मंदिर काय किंवा राजवाडे संशोधन मंदिर काय, ह्या संस्था म्हणजे धुळ्याच्या शोभा आहेत. तीं सांस्कृतिक भूषणें आहेत. शंकररावजींनी तेथील पोथ्या आपल्या प्राणाप्रमाणे जतन केल्या. संस्था स्थापिल्या, त्या जोपासल्या व वाढविल्याहि. आता ते दिवंगत झाले. त्यांच्यामागे त्यांचे वारस व विश्वस्त आहेत. त्यांच्यावर ह्या संस्थांची जोपासना करण्याची जबाबदारी आहे. म्हणून इतर मराठी वाङ्मयसेवकांनी स्वस्थ बसतां कामा नये. त्यांच्यावर संस्थास्थापकांचें मोठें वाङ्मयीन ऋण आहे. त्या ऋणाची भरपाई इतर संशोधकांनी करणें प्राप्त आहे. तसा त्यांनी प्रत्यक्ष संशोधनाने व संपादनाने शंकररावजींच्या आत्म्याला दिलासा देणें हें त्यांचें कर्तव्य आहे व तें इतर संशोधक करतील.

शंकररावजींच्या आत्म्याला शांति मिळो ! त्यांच्या चरणीं ही माझी प्रणामांजलि अर्पण असो ! ● ● ●

भवानीशंकर पंडित

# सावरकरांचें कवित्व

## सावरकरांचा साहित्यसंदेश

वीस वर्षांपूर्वी साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदावरून सावरकरांनी ' लेखण्या टाका आणि बंदुका रोखा ' असा संदेश दिला होता. वरवर विचार केला तर या संदेशांतील ' लेखण्या ' व ' बंदुका ' या दोन शब्दांत विरोध दिसतो. परंतु सूक्ष्म विचाराअंतीं तो केवळ विरोधाभास आहे हें लक्षांत आल्याखेरीज राहत नाही. हा संदेश देण्यांत ' लेखण्या ' या ' बंदुका 'प्रमाणे सामर्थ्यशाली करा असें सुचविण्याकडे सावरकरांचा रोख होता. त्यांनी स्वतः आपल्या लेखणीचें सामर्थ्य अजमाविलें होतें आणि तें ब्रिटिश सरकारच्या प्रत्ययाला आणून दिलें होतें. त्यांनी रचलेले पोवाडे व मेळ्यांतील पदें आणि लिहिलेले ' १८५७ चें स्वातंत्र्यसमर ' व ' शिखांचा इतिहास ' हे ग्रंथ त्या अन्यायी सरकाराने जप्त केले होते. या जप्त वाङ्मयाच्या सामर्थ्याची जाणीव महात्मा गांधींनाहि होती. १९१८ सालीं त्यांच्या आठवणी प्रसिद्ध होत असतांना ' पुंडलिकजी ' नामक एका गृहस्थांनी ' आपण सावरकरांच्या वाङ्मयाचा अभ्यास करावा का ? ' म्हणून पृच्छा केली होती. तिला उत्तर देतांना महात्माजींनी लिहिलें होतें, " तीं पुस्तकें वाचण्यास मुळीच हरकत नाही. पण सरकारला तुम्ही अगाऊ कळविलें पाहिजे की, मी हीं जप्त पुस्तकें वाचीत आहे व तीं माझ्याकडे आहेत आणि याचे जे परिणाम होतील तेहि भोगण्यास तयार झालें पाहिजे. बॅ. सावरकरांचीं पुस्तकें वाचून एवढाहि धोका स्वीकारण्यास आपण तयार होऊं नये काय ? " महात्मा गांधींची ही साक्ष सावरकरांच्या वाङ्मयाची ओजस्विता आणि तेजस्विता सिद्ध करण्यास पुरेशी आहे. यावरून सावरकरांच्या संदेशांत ' वाङ्मय शक्तिशाली हवें ' हा अर्थ अभिप्रेत असल्याचें स्पष्ट होईल.

## वाङ्मय व व्यक्तित्व

वाङ्मय शक्तिशाली होण्यास ज्या व्यक्तीने तें निर्माण केलें, तिचें व्यक्तित्व तितकेंच जोरदार असावयास हवें. वाङ्मय आणि व्यक्तित्व यांचे संबंध एकमेकांशीं निगडित आहेत. वाङ्मय म्हणजे जीवनाचा उद्गार ! अर्थात्, तो ज्या व्यक्तीच्या जीवनाचा असेल, तिचें व्यक्तित्व जितकें विशाल, व्यापक व वैशिष्ट्यपूर्ण असेल, तितकेंच तिचें वाङ्मय भव्योदात्त, उदार आणि बलसंपन्न असणार. अशा प्रकारचें आगळें आणि वेगळें व्यक्तिमत्त्व सावरकरांपाशी आहे. भारतांतील भिन्न भिन्न नेत्यांच्या चरित्रांचा विचार करतांना असें दिसतें की, त्या नेत्यांच्या मागे कांही संस्था व परंपरा होत्या. परंतु सावरकर ही ' व्यक्ति ' आहे. ती ' संस्था ' किंवा ' परंपरा ' नाही. रामायणांत ज्याप्रमाणे आदिपासून अंतापर्यंत एक 'राम'च आहे, त्याचप्रमाणे सावरकरांच्या जीवनांत एकटे तेच आहेत. रामायणांत जसा बाललीला करणारा, पित्याची आज्ञा ऐकणारा, यज्ञ रक्षण करणारा, धनुर्भंग करणारा, रावणाला मारणारा व सीतेचा त्याग करणारा ' राम ' दृष्टीस पडतो, तसेंच सावरकरांच्या वाङ्मयांत लहानपणीं भगूरला केसरी, काळ, गुराखी इत्यादि पत्रांचें वाचन करीत असतांना त्यांपासून देशभक्तीची स्फूर्ति घेणाऱ्या सावरकरांपासून तों जन्मठेप शिक्षा अकुतोभय वृत्तीने सोसून पुन्हा स्वातंत्र्यकार्यरत होणाऱ्या क्रांतिवीर सावरकरांचें दर्शन घडतें, आणि हें दर्शन त्यांच्या काव्यवाङ्मयांत विशेष उत्कटत्वाने घडतें.

वाङ्मयाच्या भिन्न भिन्न प्रकारांत ' काव्य ' हा वाङ्मयप्रकार व्यक्तित्वाच्या प्रबल व उत्कट अभिव्यक्तीस अनुरूप आहे. कारण काव्याच्या अभिव्यक्तींत कवीची भूमिका व्यवस्थाची नसल्यामुळे आणि काव्य हें साक्षात् त्याच्याच मुखाने बाहेर पडत असल्यामुळे, त्यांत आत्मीय भावनेचा आविष्कार प्रांजल, प्रामाणिक, प्रकट आणि प्रत्यक्ष असतो. क्वचित् त्याचा आविष्कार कलात्मक असला, तरी तो सरळ आणि स्वाभाविक असतो. त्यामुळे ' श्रोत्या ' च्या लोचनांवर, कानांवर आणि मनावर जसा ' काव्या 'चा परिणाम होतो, तसा तो अन्य वाङ्मयप्रकारांचा होत नाही. सावरकरांचें काव्य या दृष्टीने विशेष आहे. कारण त्यांच्या वाणींत प्रभावी वक्तृत्व आहे आणि तेंच त्यांच्या लेखणींत उतरलें आहे.

## सावरकरांचें काव्य

सावरकरांच्या काव्याच्या अक्षराअक्षरांतून त्यांचे मौलिक विचार आणि उत्कट भाव अक्षर झाले आहेत. सावरकरांचें एकंदर चरित्रच अद्भुत आहे. त्यांचें अलौकिक स्वातंत्र्यप्रेम; अन्याय आणि अत्याचार याविषयींचा त्यांचा तीव्र तिरस्कार; दलित, पतित आणि दास यांच्या-संबंधीची त्यांची व्यापक सहानुभूति; त्यांचें प्रचंड कर्तृत्व, अचाट साहस आणि अक्षुण्ण निर्भयता; क्रांतीवरील त्यांची श्रद्धा आणि त्यांचा आत्मविश्वास, हिंदु राष्ट्राविषयीचा त्यांचा असीम आदर; त्यांचें कणखर धोरण; त्यांचें अविचल धैर्य आणि त्यांचा अमर आशावाद—या सर्व गुणांचा प्रत्यय त्यांच्या कवितासंग्रहाच्या पानापानांतून पटतो. १८९४ पासून तों १९३८ पर्यंतच्या सुमारें ४५ वर्षांच्या काळांत त्यांच्या कवितालेखनांत कधीहि खंड पडला नाही. जवळ लेखनसामग्री नसतांना काळ्या पाण्याच्या ' नृशंसक गुहांच्या अंधुक उजेडां 'त देखील त्यांच्या जिवंत आणि जातिवंत प्रतिभेला ' कमले 'सारखें सरसरमणीय काव्य स्फुरल्याशिवाय राहवलें नाही ! अशा या प्रतिभासंपन्न महाकवीची कविताकृति श्रीमहाराष्ट्रशारदेला भूषणास्पद वाटली तर त्यांत नवल तें काय ?

## ' देशभक्ति प्रारंभ जीवनाचा । आत्मयज्ञाने अंत व्हावयाचा '

सावरकरांच्या कवितेचा आरंभ देशभक्तीने झाला आहे. त्यांच्या प्रतिभेला ज्या प्रारंभिक प्रेरणा मिळाल्या, त्या मराठ्यांच्या इतिहासांतून आणि सर वॉल्टर स्कॉटसारख्या ऐतिहासिक कविता व कादंबऱ्या रचणाऱ्या ग्रंथकाराकडून. सावरकरांच्या आरंभीच्या कविता गुणदृष्ट्या आगळ्या नाहीत हें खरें; परंतु त्यांतहि त्यांचें स्वातंत्र्यप्रेम प्रकट झालें आहे हें लक्षांत घेण्या-सारखें आहे. साधारण समजूं लागतें, त्या वयाच्या विद्यार्थिदशेंत त्यांनी कांही पोवाडे लिहिले आहेत. ते मात्र भावपक्ष व कलापक्ष या दोन्ही पक्षांच्या दृष्टींनी प्रशंसनीय आहेत. त्यांतल्या त्यांत विशेषतः ' तानाजी ' व ' बाजी प्रभू ' यांवरले पोवाडे तर अत्युत्कृष्ट आहेत. हे पोवाडे प्राचीन पोवाड्यांप्रमाणे स्फूर्तिप्रद असले, तरी त्यांच्याप्रमाणे कलाहीन नाहीत. प्राचीन पोवाडे हे केवळ ऐतिहासिक घटना म्हणून लिहिले गेले. परंतु सावरकरांचे पोवाडे हे तत्कालीन पारतंत्र्या-विषयी चीड उत्पन्न व्हावी म्हणून रचले गेले, आणि सरकारने त्यांच्यावर नौबत आणूं नये म्हणून त्यांना इतिहासाचा पेहेराव चढविण्यांत आला. पण सावरकरांचा मूळ उद्देश त्या पेहेरावाआड गुदमरूं लागला. त्याचा परिणाम असा झाला की, सरकाराने ' तानाजीचा पोवाडा ' जप्त केला व तो कालपरवापर्यंत जनतेच्या दृष्टीला पडूं दिला नाही !

## वाचें बरवें कवित्व

सावरकरांच्या वाणीचा विलास व प्रतिभेचा उल्हास त्यांनी १९०६ पासून पुढे १९२४ पर्यंत जीं काव्यें लिहिलीं त्यांत दृष्टोत्पत्तीस येतो. हीं काव्यें दोन दृष्टींनी पूर्णतया मौलिक

आहेत. एक तर त्यांच्यावर तत्कालीन कोणत्याहि कवीच्या काव्यांचा पुसटहि परिणाम झालेला नाही. कारण तीं महाराष्ट्रापासून दूर विलायतेंत व अंदमानला जन्माला येत होतीं. दुसरें असें कीं, तीं सर्व सावरकरांच्या व्यक्तिगत जीवनांतून उत्स्फूर्त होत होतीं. या काव्यांतील प्रसंग प्रत्यक्ष सावरकरांच्या जीवनांतील असल्यामुळे त्यांत त्यांनी स्वतःच्या दृष्टिकोनांतून जीवनाचें भाष्य सांगण्याचा प्रयत्न केला आहे.

'प्रभाकरास', 'तारकांस पाहून', 'सागरास', 'माझें मृत्युपत्र' व 'सांत्वन' हीं या कालखंडांतील काव्यें सर्वथैव वैयक्तिक असलीं, तरी त्यांतल्या आत्मीयतेच्या भावनेचें साधारणीकरण इतक्या व्यापक स्वरूपांत झालें आहे की, कुणीहि सहृदयाने त्यांचा पुन्हा पुन्हा आस्वाद घ्यावा आणि त्यांतला अनुभव निर्विकल्प मनःस्थितींत स्वतः उपभोगावा. 'तारकांस पाहून' हें गीत तरुण सावरकरांनी विलायतेस जात असतांना आगबोटीच्या डेकवर लिहिलें आहे. ते आकाशाकडे टक लावून पाहत असतांना एक 'चटक चांदणी' तेथून निसटून मोठ्या लगबगीने 'सागराच्या जलमंदिरां'त शिरते. त्याबरोबर ते सागरास उद्देशून म्हणतातः—

लाजुं नको, जा भोग विलासा कामोत्सुक तूं, ती
तुझिया शतजलतरंगमंजुल सुखा साथ देती
प्रेमाची चांदणी परंतू ज्यांची दूर वसे
किती प्रवासी तळमळती बा, तुझ्या निकट ऐसे

हा या गीतांतील गोड 'विप्रलंभ' सावरकरांनी 'गोमांतक' काव्यांत 'आंबराई'चें वर्णन करतांना पुन्हा व्यक्त केला आहे —

शैशवांत जशी आई, **विरहांत जशी प्रिया,**
आनंद आंबराई दे उन्हाळ्यांत तशीच या.

'तारकांस पाहून' ही कविता शृंगारिक आहे, तर 'प्रभाकरास–' ही कविता करुण आहे. त्या विलापिकेंत पुत्रनिधनाने व्यथित झालेला प्रेमळ परंतु धीरोदात्त पिता सावरकरांच्या रूपाने अवतरला आहे. तो रडत नाही की मृत्यूच्या नांवाने खडे फोडीत नाही. उलट, तो सयमाने अश्रु आवरतो; आणि दूर हिंदुस्थानांत असलेल्या 'प्रभाकरा'स म्हणतोः—

देशिं जसा होतास विदेशीं सन्निधची सखया
अमूर्त तूं कल्पना एक मधुमधुर अशी हृदया
अतनु मूर्ति तव लटकुनि कितिदां हृदयाशीं निजली
हसली कितिदा दिव्याशेनें कितिदां ती सजली
हृदय जोंवरी प्रभ्या प्रियाळा, असाचि तिथ राहे
पूर्वार्जित मद्–हृदय गृह असे तुझेंचि तनया हे.

मागे गुप्तचरांचा ससेमिरा लागलेला देशभक्त पिता आपल्या मुलाला दुसरी कोणती मालमत्ता देणार?

'सागरास' आणि 'माझें मृत्युपत्र' या कवितांत सावरकरांतला 'मायाळू कुटुंबवत्सल' दर्शन देतो. परंतु हा 'कुटुंबवत्सल' सर्वसाधारणांसारखा असूनहि निराळा आहे. तो ध्येयनिष्ठ आहे. परतंत्र मातृभूमि स्वतंत्र करण्याचें 'व्रत' त्याने घेतलें आहे. कमळ पाण्यांतलें खरें, पण पाण्यापासून तें अलिप्त आहे. म्हणूनच त्याच्याकडे सर्वांचें लक्ष्य वेधतें. गुप्तचरांचा ससेमिरा मागे असतांना थोडाफार विरंगुळा म्हणून सावरकर ब्रायटनला समुद्रकाठीं हिंडत होते. तोंच त्यांना 'स्वजनां'ची आठवण आली. आपण विलायतेंतच धरलें गेलों, तर आपल्या मायभूमीला आपल्या विद्येचा काय उपयोग होणार, तेव्हां ते 'सागरास' उपलक्ष्य करून विचारूं लागले—

गुणसुमनें मीं वेंचियलीं या भावें। कीं तिनें सुगंधा घ्यावें
जरि उद्धरणीं व्यय न तिच्या हो साचा। हा व्यर्थ भार विद्येचा

ती आम्रवृक्षवत्सलता । रे
नवकुसुमयुता त्या सुलता । रे
तो बाल गुलाबहि आतां । रे
फुल्बाग मला हाय पारखा झाला । सागरा, प्राण तळमळला ॥

हाच मातृभूमीविषयीचा जिव्हाळा आणि स्वजनांविषयींचा कळवळा ' मृत्युपत्रां 'त व्यक्त झाला आहे. ' मृत्युपत्रां 'त तर सावरकरांची ' साहित्यिक ' ही भूमिकाहि उघड झाली आहे. तेव्हा ' लेखण्या टाका ' या त्यांच्या संदेशांत ' त्या सामर्थ्यशाली करा ' हा आशय अभिप्रेत होता याविषयी कांही शंका राहत नाही. कारण एका ठिकाणीं ते स्पष्टच म्हणतात की—

हे मातृभूमि ! तुजला मन वाहियेलें । वक्तृत्व वाग्विभवही तुज अर्पियेलें
तूंतेंचि अर्पिलि नवी कविता रसाला । लेखाप्रती विषय तूंचि अनन्य झाला.

याच कवितेंत जीवन हें कसें प्रखर असावें तेंहि सांगितलें आहे—

कीं घेतलें व्रत न हें अम्हि अंधतेनें । लब्ध-प्रकाश इतिहास-निसर्ग-मानें
जें दिव्य, दाहक म्हणून असावयाचें । बुद्ध्याचि वाण धरिलें करिं हें सतीचें.

जें जें दिव्य असतें, तें तें दाहक असतें. दिव्यजीवन हवें असेल तर दाहकता सोसण्यास सिद्ध व्हा. सावरकरांचें काव्य दाहकता सहन केली म्हणूनच दिव्य झालें आहे !

' सांत्वन ' या कवितेंत सावरकरांनी ते स्वतः व त्यांचे वडील बंधु पकडले गेले, त्या वेळीं आपल्या वडील भावजयीला जें धीर देणारें पत्र लिहिलें, तें ग्रथित झालें आहे. त्यांतहि त्यांची निर्भयवृत्ति प्रकटली आहे. ते भावजयीला म्हणतात,—' गजेंद्राने जें फूल उपटून देवाला वाहिलें त्या फुलाची महती विशेष. त्याचप्रमाणे मातृभूमीसाठी आमचें बलिदान झालें, तर आपला वंश अमर होईल.' सावरकरांच्या या साऱ्याच कविता उदात्ततेने ओतप्रोत आहेत ! त्यांत कारुण्य असलें, तरी गांभीर्य आहे; आणि आशा व आत्मविश्वास यांचा संचार आहे ! सावरकरांच्या वाचेने हें असें ' बरवें कवित्व ' निर्मिलें आहे.

## कवित्वीं रसिकत्व

रस हा काव्याचा आत्मा आहे. हा रस सावरकरांच्या काव्यांत भरपूर आहे. सावरकरांना शिक्षा झाल्यावर अंदमानला बंदिवान् म्हणून पाठविण्यांत आलें. तेथे त्यांनी नोकदार दगडाने भिंतीवर काव्य लिहून तें स्मरण करण्याचा उपक्रम सुरू केला. अशा या सुरस व चमत्कारिक परिस्थितीमधूनच ' कमला ' या ऐतिहासिक पार्श्वभूमि असलेल्या कल्पित कथाकाव्याचा संभव झाला आहे. हें काव्य अपूर्ण राहिलें आहे. पण त्याचें अभिजात कलात्मक स्वरूप मनाला भुरळ पाडणारें आहे. एक नवविवाहित तरुण पानपतावर जातो व तिकडेच त्यांचा अंत होतो हें या काव्याचें कथासूत्र आहे. त्यांत तरुणाच्या जीवनांतील प्रेमाच्या व पराक्रमाच्या प्रसंगांची गुंफण आहे. काव्य अपूर्ण राहिल्यामुळे बहुतेक प्रसंग प्रेमाचेच आहेत काव्याच्या आरंभीं ' फुलबागे 'चें वर्णन आहे. त्यांतला हा ' सोनचांफा ' पहा :–

आणि हे सोनचांफ्या, तूं शिकलासि तरी कुठें
ही दिव्य किमया ? आम्हां स्वयंमन्य नरां जिथें
रुप्याचेंही करायासी जड स्वर्ण न साधतें
ओल्या मातींत सूर्याचीं किरणें पिळुनी तिथें
मृदुचेतन सोन्याचीं, स्वर्णचंपक ! हीं फुलें
सुगंधी तुज पाहूनी निर्मितां मन हें भुलें !

हें काव्य शेवटपर्यंत नव्या नव्या कल्पनांनी परिपूर्ण आहे. सावरकरांपाशी ज्याप्रमाणे स्वतंत्र विचार व उत्कट भाव आहेत, त्याचप्रमाणे उत्तुंग कल्पनाहि आहेत !

### रसिकत्वीं परतत्त्वस्पर्श

अंदमानांत हालअपेष्टांचें एकाकी जीवन कंठीत असतांना आणि सत्तेची पोलादी टाच वारंवार प्रहार करीत असतांनाहि सावरकरांचें धैर्य यत्किंचित् विगलित झालें नाही याचें कारण त्यांची दृढ श्रद्धा होय. 'आत्मबल', 'जगन्नाथाचा रथोत्सव', 'सूत्रधारास' आणि 'अज्ञेयाचें रुद्धद्वार' या कवितांवरून त्यांच्या अंतःकरणास परतत्त्वाचा स्पर्श होत असावा असें वाटतें; आणि ज्या काळीं या कविता लिहिल्या, तो काळहि अशा प्रकारच्या कविता लिहिण्यास जी मनःस्थिति लागते, तिला अनुकूल होता. सावरकरांच्या या साऱ्याच कविता भक्तिभाव, श्रद्धा आणि विश्वास यांच्यांतून उत्पन्न झालेल्या असल्यामुळे कुणाच्याहि अंतःकरणाची पकड सहज घेतात. बुद्धीची कितीहि प्रगति झाली, आणि ज्ञानाची केवढीहि वाढ झाली, तरी शेवटीं मनुष्य हा भावनामय व अपूर्ण आहे !

### गोमांतक आणि इतर काव्यें

गोमांतक या महाकाव्यांत आणि इतर स्फुट काव्यांत सावरकरांचें हिंदुत्वाविषयक तत्त्वज्ञान आलें आहे. जो जो या भारताला आपली मातृभूमि मानत असेल, तो तो हिंदु, अशी सावरकरांची हिंदुत्वाची व्याख्या आहे. हिंदु लोक धर्मभोळेपणा, अज्ञान, रूढि, दुबळेपणा, भीरुत्व, सहिष्णुत्व इत्यादि दोषांनी पछाडलेले आहेत. त्यामुळे परधर्मीय त्यांच्यावर आक्रमणें करतात. तेव्हा हिंदूंनी बलशाली बनलें पाहिजे असा सावरकरांचा आदेश आहे. त्यांचें गोमांतक काव्य मोठें त्वेषपूर्ण व आवेशपूर्ण आहे. देवभोळ्या हिंदूंवर टीका करतांना ते एके ठिकाणीं स्पष्टच विचारतात की,—

देवही दुबळ्यांचे कीं असणार किती बळी ?

या काव्यांत सावरकरांचीं मतें प्रदर्शित झालीं असलीं, तरी त्याचें स्वरूप प्रचारकी पद्धतीचें नाही. कारण या काव्यांत सावरकरांची स्वतःची गर्जना आहे. दुसऱ्याच्या आवाजाचा प्रडसाद नाही.

### सावरकरांची शैली

सावरकरांची स्वतःची अशी निराळी लेखनशैली आहे. ते प्रभावशाली खंदे वक्ते असल्यामुळे त्यांच्या लेखनांत वक्तृत्व आढळतें. त्यांचा स्वभाव भावनामय आहे. त्यामुळे त्यांच्या लेखनांत निरनिराळ्या भाव-भावनांचा संचार दिसतो. त्यांचे विचार स्वतंत्र असले, तरी ते भावनेच्या ओघांत प्रकट होतात. त्यामुळे ते सरस वाटतात. काव्यांत ते कल्पना योजतात. त्यांत नावीन्य आढळतें. अशा रीतीने त्यांचें लेखन त्रिगुणात्मक म्हणजे बौद्धिक, हार्दिक व कल्पनामय आहे.

सावरकरांच्या वाणींत जो ओघ व वेग आहे, तोच त्यांच्या लेखणींत उतरला आहे. त्यांची भाषा संस्कृतप्रचुर असली, तरी क्लिष्ट नाही. तिच्यांत त्यांच्या करारी स्वभावामुळे एक-प्रकारचा खणखणीतपणा आहे.

प्रदीर्घ रचनेकरिता सावरकरांनी अनुष्टुप किंवा वैनायक यांसारख्या धावत्या वृत्तांचा अवलंब केला असून क्वचित् नामांवरून साधलेलीं क्रियापदें योजलीं आहेत; आणि मिल्टनच्या शैलीचें अनुसरण करून पल्लेदार वाक्यरचना साधली आहे. वाढत्या मराठी भाषेच्या विकासा-साठी त्यांचे हे प्रयत्न उपकारकच म्हणावे लागतील ! ● ● ●

अनुक्रमणिका

वसंत स. जोशी

# संतोषमुनीकृत 'लघु रुक्मिणी स्वैंवर'

## महानुभावीय 'रुक्मिणी-स्वयंवरें'

ज्ञानेश्वरांच्यापूर्वी होऊन गेलेल्या चक्रधरापासून ते तहत् सोळाव्या शतकापर्यंत निरनिराळ्या महानुभावीय कवींनी मराठींत रचना केलेली आहे. त्यांत प्रामुख्याने चक्रधरविषयक ग्रंथांवर भाष्यें व टीका आहेत, तशींच कांही आख्यानकाव्येंहि आहेत. या पंथांतील विशिष्ट ग्रंथांप्रमाणेच भगवद्‌गीता आणि भागवतहि महानुभावीयांना प्रिय आहेत. महानुभावीयांचें मुख्य दैवत 'श्रीकृष्ण' हेंच आहे. श्रीकृष्ण, श्रीदत्तात्रेय, द्वारावतीचे चांगदेव राऊळ, ऋद्धिपूरचे गुंडम राऊळ आणि श्रीचक्रधर हें महानुभावीयांत 'पंचकृष्ण' म्हणून मानले जातात. यामुळे श्रीकृष्णविषयक वाङ्मय महानुभावीयांकडून मोठ्या प्रमाणांत निर्माण झालें असल्यास नवल नाही.

बाराव्या आणि तेराव्या शतकांत लिहिण्यांत आलेले सुप्रसिद्ध 'साती ग्रंथ' हे महानुभाव पंथांतील आद्य व पवित्र ग्रंथ मानले जातात. त्यांतील चार ग्रंथ तर श्रीकृष्णाच्या चरित्रावरच लिहिण्यांत आले आहेत. दामोदरपंडितकृत 'वच्छाहरण' (शके १२००)[1], नरेंद्रकृत 'रुक्मिणीस्वयंवर' (शके १२१४), भास्करभट्ट बोरीकरकृत 'शिशुपालवध' (शके १२३०) व 'उद्धवगीता' हे ते ग्रंथ होत. यांतील पहिलीं तीन आख्यानकाव्येंच आहेत. श्रीकृष्णाच्या चरित्रांतील 'रुक्मिणी-स्वयंवरा'चा भाग जितका रोमहर्षक तितकाच तो शृंगार कवींस उत्तेजक व स्वैर कल्पनाविलासास पोषक असा आहे. त्याचमुळे नरेंद्रासारख्या रसिक कवीने त्यावर आपल्या ललितरम्य शैलींत केलेली रचना आजहि रसिक वाचकाच्या मनास मोह घालते. या स्वयंवराचें दुसरें एक वैशिष्ट्य असें की, जो ज्या दृष्टीने या कथानकाकडे पाहील, तशी सृष्टि त्याला निर्माण करतां येते. सर्व देवतें हीं श्रीकृष्णाहून कनिष्ठ असून तोच एक परमेश्वर हा आपला आवडता सिद्धान्त प्रतिपादन करावयास महानुभावीयांना हें आख्यान साहाय्यकारी झालें. त्याचप्रमाणे एकनाथांसारख्या कवीला रुक्मिणी आणि श्रीकृष्ण यांचा विवाह म्हणजे जीव आणि शिव यांचा मिलाफच होय, असें प्रतिपादन करावेंसें वाटलें. मराठी साहित्यांतील आद्य कवयित्री मानली जाणारी महदाइसा हिचीं दोन काव्यें 'रुक्मिणीस्वयंवरा'-वरच आहेत. गोविंदप्रभूंच्या विवाहप्रसंगीं रचलेलें काव्य 'धवळे' या नांवाने प्रसिद्ध असून दुसरें 'मातृकी रुक्मिणी-स्वयंवर' या नांवाने प्रसिद्ध आहे. हें काव्य अगदी लहान ११० ओव्यांचें आहे.

१. प्रा. सुरेश म. डोळके या काव्यास 'वत्साहरण' हें नांव देतात व केशिराज मुनि हा या काव्याचा कर्ता मानतात. (पाहा : म. सा. पत्रिका–अंक १२३).

### संतोषमुनीचें ' लघु रुक्मिणी सैंवर '

अशाच तऱ्हेची 'रुक्मिणी-स्वयंवरा'वरील रचना पंधराव्या शतकांतील महानुभावीय कवि संतोषमुनी कृष्णदास याने केलेली आहे. हा संतोषमुनी पारमांडल्य आम्नायांतील होता. शके १४७५-७६त रचिलेल्या याच्या 'रुक्मिणी-स्वयंवराचे' अध्याय मुळांत २५ असून ओवीसंख्या ३२०५ आहे. पुढे शके १६४१ मध्ये कोणा पौषदाख्य मुनीने या काव्याचें शोधन करून त्यांत आणखी ५३५ ओव्यांची भर घातली व त्याची ओवीसंख्या ३७४० वर नेली. मूळ काव्य संतोषमुनी कृष्णदासाने भागवत व पद्मपुराण यांच्या आधारें रचिलें असून त्याचा प्रारंभ गोदातीरीं कुंकुमठाणें येथे व समाप्ति सिन्नर येथील भिल्लमाच्या मठींत पूर्ण झाली, असें तो सांगतो.[२].

हें संतोषमुनि कृष्णदासाचें एकदा प्रसिद्ध झालेलें मूळ ' रुक्मिणी-स्वयंवर ' आज दुर्मीळ झालें आहे. यासंबंधी मला पाठविलेल्या पत्रांत महानुभाव वाङ्मयाचे अभ्यासक व थोर संशोधक नागपूरचे डॉ. वि. भि. कोलते म्हणतात, " संतोषमुनि हा १५ व्या शतकांत होऊन गेलेला महानुभाव कवि होय. त्याने आपला हा ग्रंथ सिन्नर ( जि. नाशिक ) येथील भीलमठांत लिहिला. भीलमठ म्हणजे भिल्लम यादवाने बांधलेला मठ. तो वरील गांवीं अजूनहि आहे... प्रस्तुत काव्यग्रंथ एक वेळ छापूनहि प्रसिद्ध झालेला आहे. महानुभावाजवळ प्रती पाहायला मिळतात. बाजारांत पुस्तक विकत मात्र मिळत नाही. अनेक पोथ्यांच्या आधारें हेंच काव्य पुनर्मुद्रित करण्याचे प्रयत्नहि चालू आहेत. "

या संतोषमुनी कृष्णदासाने आपल्या ग्रंथांत मराठी भाषेची थोरवी वर्णिली असून मागधी, शौरसेनी, पिशाच, अपभ्रंश, प्राकृत या भाषांचाहि उल्लेख केला आहे. ' या भाषांचे पाकविस्तार। करावेया मराठी एक चतुर ' असें तो म्हणतो. ' म्हणोनि संस्कृताची टीका। महाराष्ट्री म्हणिजताये आइका। जैसी हेमाची मुद्रिका। वरी गरुड पाचू॥ ' असें मराठीचें वैशिष्ट्य त्याने सांगितलें आहे.

### हस्तलिखिताची माहिती

अशा या महाराष्ट्र भाषेच्या अभिमानी कवीचें आणखी एक अप्रकाशित ' लघु रुक्मीणी सैंवर ' मला उपलब्ध झालें असून त्याचाच या लेखांत परिचय करून द्यावयाचा आहे. हें हस्तलिखित आमच्याच निपाणी येथील घरीं सापडलें. सहज कुतूहलाने तें वाचून पाहिल्यानंतर तें महानुभाव पंथाचें वाङ्मय असून भाषेच्या दृष्टीनेहि बरेंच जुनें असल्याचें आढळलें. या हस्तलिखिताचा आकार ४" × २॥" असा म्हणजे अगदीच छोटा आहे. प्रत्येक पानांस फक्त सात ओळी आहेत. कागदहि बराच जीर्ण आहे. मध्यंतरीच्या कांही व सुरुवातीच्या २० ओव्या दुर्दैवाने उपलब्ध नाहीत. एकूण ८५ ओव्यांचें हें ' लघु रुक्मीणी सैंवर ' असून त्यानंतर सप्तश्लोकी गीता व फलश्रुतीचा एक श्लोक इतका भाग या हस्तलिखितांत आहे. हें काव्य ओवीबद्ध असून अक्षरहि सर्वसामान्यपणें कळूं शकेल, इतकें स्पष्ट आहे. कालनिर्णयास आवश्यक असा कांहीच उल्लेख यांत नाही. परंतु ग्रंथकर्त्याने स्वतःची माहिती मात्र एक-दोन ओव्यांत दिलेली असून, त्यावरून हा संतोषमुनी म्हणजेच वर उल्लेखिलेला भिल्लम मठांतील ' संतोषमुनि कृष्णदास ' हा कवि होय, हें सिद्ध होतें. या काव्यांतील ७४ व्या ओवींत स्वतःविषयीची माहिती देतांना तो म्हणतो,

२. डॉ. शं. गो. तुळपुळे, महाराष्ट्र सारस्वत : पुरवणी ( पृष्ठ ९३७ ).

कवी संतोसमुर्णीने केला ग्रंथ : सैंवरी वर्नीला श्रीआणंत :
तयासि संतोसमुनी वीणवित : दासभील मटी

त्यानंतर ८० वी ओवी अशी आहे—

जी जी मज काळिलें आणंता : तुं उदास जालासि कृपावंता :
ते अपराध उपसाहोनि आच्युता : रक्षी संतोसा भीलमटांतु ॥

**काव्यरचनेचा उद्देश**

हें लघु रुक्मिणी-स्वयंवर रचण्याचा कवि संतोषमुनीचा उद्देश भवतापापासून संसारी जनांना त्याचप्रमाणे स्वतःलाहि मुक्त करुन घेण्याचा होता, असें दिसतें. संस्कृत 'काव्यप्रकाश'-कार मम्मट याने काव्यरचनेचे विविध उद्देश सांगितले आहेत.[१] त्या अनेक उद्देशांपैकी अमंगलापासून रक्षण होण्याकरिता आणि अडचणीच्या प्रसंगांतून त्वरित तरुन जाण्याकरिता अनेक ग्रंथांचीं पारायणें लोकांकडून होत असतात. एकनाथांचें ' रुक्मिणी-स्वयंवर ' अविवाहितांकडून वरचेवर वाचलें जातें आणि अशुभ निवारणाकरिता, मानसिक समाधानाकरिता किंवा इष्टफलप्राप्तीकरिता ' गुरुचरित्रा 'चींहि असंख्य पारायणें होत असल्याचें आपल्याला दिसून येतें. ग्रंथ वाचणाऱ्याला जर इतकी फलप्राप्ति होत असेल, तर तो लिहिणाऱ्यासहि सुखप्राप्ति होऊन मोक्षाचा मार्ग खुला होत असला पाहिजे. सूर्यस्तुति लिहून कुष्ठरोग घालविणारा मयूर कवि किंवा पापविमोचनाकरिता ' गंगालहरी ' लिहिणारा जगन्नाथ यांना अशी फलप्राप्ति झाल्याचेंहि आपण ऐकतों. कवि संतोषमुनीनेसुद्धा अशाच प्रकारें ' शिवेतरक्षतये ' आणि 'सद्यः परनिर्वृतये ' या कारणाकरिता या छोट्याशा काव्याची रचना केली आहे त्याचा मूळचा ' रुक्मिणी-स्वयंवर ' हा ग्रंथ ३७४० ओव्यांचा असल्याचा उल्लेख वर आलाच आहे. या ग्रंथाचें नेहमी पठन होणें अशक्य असल्याने त्यांतील कथा थोडक्यांत या लघुकाव्यांत त्याने सांगितलेली आहे.

संतोषमुनि या संसारतापाने अत्यंत जर्जर झाला असून फारच कारुण्यपूर्ण रीतीने त्याने श्रीकृष्णाचा धावा केलेला आहे. तो म्हणतो,

भववेथा महाकठीण : येनें सोखीला माझा प्राण :
तुजवांचुनि मज आहे कवन : गाऱ्हानें सांगावया ॥ ७२ ॥

आणि स्वतःचें दुःखमय गाऱ्हाणें परमेश्वराजवळ सांगतांना आपल्या अपराधांच्या राशी गगनाला भेदून गेल्या आहेत असें स्पष्ट कबूल करुन अत्यंत काकुळतीने तो म्हणतो,

जे जे आपराध केले मीयां : ते उपसाहिजो जी स्वामियां :
हे भववेथा नासोनिया : मज रक्षी मायबापा ॥ ७९ ॥

भवव्यथेचा ताप त्याला मुळीच सहन होईनासा झाला आहे; परंतु त्यावरील औषध म्हणजेच ' रुक्मिणी-स्वयंवरा 'चें पठन अशी त्याची श्रद्धा आहे; म्हणूनच तो म्हणतो,

जी तुझे रुक्मीनी सैंवर : नीत्य पटन करीतो गीर्धार :
औशधाचा विचार : तर घेतो चरणोदक ॥ ८१ ॥

या लघुकाव्यांतील कांही ओव्या कवीचें चरित्र समजावून घेण्याच्या दृष्टीने महत्त्वाच्या आहेत. कवि संतोषमुनि कृष्णदास याने आपलें मूळचें मोठें ' रुक्मिणी-स्वयंवर ' पूर्ण केल्या-

१. काव्यं यशसे अर्थकृते व्यवहारविदे शिवेतरक्षतये ।
सद्यः परनिर्वृतये कान्तासम्मिततयोपदेशयुजे ॥

नंतर आपल्या वृद्धावस्थेच्या काळांत त्याने हें 'लघु रुक्मीणी सैंवर' लिहिलें आणि आर्त अंतःकरणाने 'जो भक्तकाज केवारी : ये ब्रीदें रुळताति तोडरीं' अशा अनंताला हांक मारिली. संतोषमुनीचे शेवटचे दिवस हालांत तरी गेले असावेत, एखाद्या रोगाने तो जर्जर तरी झाला असावा किंवा इतर तें मानसिक समाधानहि मिळणें त्याला दुर्लभ झालें असावें. अशा वेळीं मानसिक दुःखावरील उतारा म्हणून त्याने या कथानकाचा आश्रय घेतला असावा आणि स्वतःबरोबरच इतर संसारी जनांचा उद्धार करण्याच्या हेतूने त्याने हें लघुकाव्य रचलें असावें.

## पंथीय तत्त्वज्ञानाचा आढळ

महानुभाव पंथांत श्रीकृष्ण व दत्तात्रेय या दैवतांना फार महत्त्व आहे. त्यांच्याखेरीज इतर देवतांना या पंथांत कनिष्ठ समजलें जातें आणि यामुळेच ब्रह्मा, विष्णु आणि महेश यांचें प्रतीक असलेली तीन-मुखी दत्तात्रेयाची मूर्ति महानुभाव पंथांत पाहावयास मिळत नाही. ते एकमुखी दत्ताचीच उपासना करतात.[४] 'लघु रुक्मीणी सैंवर' रचणाऱ्या संतोषमुनीने आपल्या काव्याचा समारोप करतांना 'कल्पवृक्ष फळ दे श्रीकृष्ण दत्तात्रया' अशी प्रार्थना केलेली आहे, ती महानुभाव पंथाच्या तत्त्वज्ञानास धरूनच आहे. महानुभाव पंथाचा संस्थापक चक्रधर हा पूर्वाश्रमांत भडोच येथील राजाचा हरपालदेव नांवाचा मुलगा होय. त्याचा जन्मसुद्धा श्रीदत्तकृपेनेच झाला होता. हरपालदेवाचें 'चक्रधर' असें नामकरण करणारे गुंडम राऊळ ऊर्फ श्रीगोविंद प्रभु यांचे गुरु द्वारावतीचे चांगदेव राऊळ यांनाहि व्याघ्ररूपाने श्रीदत्तात्रेयांचें दर्शन झालें होतें. महानुभाव पंथाचीं निरनिराळीं नांवें ऐकावयास मिळतात. पंचकृष्णांच्या कल्पनेवरून 'जयकृष्णी' असेंहि नांव यास मिळाल्याचें दिसतें. चक्रधरांनी या पंथाचें महत्त्व सांगतांना 'या मार्गासि दत्तात्रेयप्रभु आदिकारण :' असे उद्गार काढले आहेत. महानुभाव पंथांतील या देवतांना विनवणी करण्यांत संतोषमुनीने औचित्यच दाखविलें आहे.

सर्वसंगपरित्याग करून परमेश्वराचें अनुसरण करणें हा महानुभाव पंथांतील 'असती परीचा मार्ग' आहे. संतोषमुनी परमेश्वरास सर्वभावाने शरण गेला आहे आणि म्हणूनच त्याच्यामध्ये 'भक्ति' किंवा 'प्रेम' या शक्तीचा संचार परमेश्वराने केला असावा. महानुभावीयांच्या कल्पनेप्रमाणे जीव हा 'बद्ध-मुक्त' आहे. अविद्येमुळे जीवाला बद्धता प्राप्त होते. परंतु परमेश्वराला सर्वभावें शरण जाऊन त्याची कृपा संपादन केली असतां तो जीव मुक्त होऊन त्याला मोक्षप्राप्ति होऊं शकते. ही मुक्तता मिळविण्याचें एक साधन म्हणूनहि संतोषमुनीने या भक्तिप्रेमयुक्त काव्याची रचना केली असावी. अनेक धार्मिक ग्रंथांतून अखेरीस कांही ना कांही फलश्रुति सांगण्यांत आलेली असते. त्याचप्रमाणे या लघुकाव्याच्या अखेरीसहि फलश्रुति दिलेली आहे. 'जे नियमितपणें ही रुक्मिणी-स्वयंवराची कथा वाचतील, त्यांचे महारोग नाहीसे होतील. हा ग्रंथ पुत्र, संपत्ति, लक्ष्मी प्रसवक असून तो वाचल्याने श्रीकृष्ण दत्तात्रय इच्छिलेलें फळ देतील' असें त्या ठिकाणीं स्पष्ट म्हटलेलें आहे. समारोपाच्या ७० व्या ओवींत संतोषमुनी म्हणतो,

ऐसें हे रुक्मीनी सैंवर : यकचीत्तें आईकती नारीनर :  
तयासि पावैल परमेस्वर : आनि चींतिलें पावती ।। ७० ।।

'महाराष्ट्र सारस्वताच्या' पुरवणींत डॉ. तुळपुळे यांनी संतोषमुनि कृष्णदासाने 'रुक्मिणी-स्वयंवरा'चे मूळ अध्याय २५ च लिहिले व नंतर पौषदाख्य गोपालमुनीने त्यांत

४. निपाणी येथील दत्तमंदिरांतील मूर्तीहि एकमुखीच आहे.

भर घातली असें म्हटलें आहे. प्रस्तुत 'लघुरुक्मीणी सेंवरां'त ६९ व्या ओवीपर्यंत या कथानकाच्या प्रत्येक अध्यायांतील सारांश सांगितलेला असून त्यामुळे प्रत्येक अध्यायांतील कथाभाग स्पष्ट होतो. अशा तऱ्हेने या काव्यांत फक्त २८ अध्यायांचाच उल्लेख असून तेवढ्या भागांत संपूर्ण कथानक संपलेलें आहे. तेव्हा मूळच्या 'रुक्मिणी-स्वयंवरा'वर या लघुकाव्या-मुळे प्रकाश पडण्याचा संभव असून ती सर्व रचना कवि संतोषमुनीची असण्याचीहि शक्यता आहे. त्या दृष्टीने संशोधन होणें जरुरीचें आहे. या लघुकाव्यांतील भाषाविषयक बाबींची चर्चा करण्यापूर्वी मला उपलब्ध झालेलें हें लघुकाव्य जसेंच्या तसें पुढे देत आहें :—

## मूळ संहिता

...द्राचिथापन्हेपासुन : णवचा आध्याय जाला संपुर्न : आतां दाहाविया अध्यायाचें ज्ञाण : करूं श्रोतेयासी ॥ २१ ॥ दाहावा आध्याई द्वारकादर्शन : दुरूनि देखे सुदेवो व्राह्मण : मग करूनिया नमन : प्रव्हानि बैसुनि उत्रला सागर ॥ २२ ॥ मग वन उपवन द्वारकेभंवती : ते सुदेवो दावी सवैलाप्रती : आनि बनकरीं सांगीतीली कर्पुरउत्पती : आन हारी चंदन ॥२३॥ आतां आकरावा आध्याई पाहे : द्वारका प्रवेसला द्वीजराये : तें द्वारकावर्णन करिताये : शेष सहश्रफनी ॥ २४ ॥ भूधर श्रमला स्तुति करिता : तीथ पुरीसि काय वर्नील कविता : ठाई ठाई नक्षेत्रलता : आनि चंद्रसूर्यो झळकती ॥ २५ ॥ ऐसे बीदी बाजार देखुनी : धिप्र संतोषला मनीं : ऐसिया णवही पौळी क्रमोनी : आला रायांगणामाजि ॥ २६ ॥ आतां बारावा आध्याई अवधारी : वीप्रासि भेटला रावो मुरारी : वीप्रमाथा ठेविला श्रीचरनावरी : दोधलें लीखीतें ॥ २७ ॥ देवें वानिया लीखीत : यकलाचि नीगाला श्रीआणंत : ऐसा भक्ताचा येळाईत : कृष्ण कृपेचा सागरू ॥ २८ ॥ आता तेरावा आध्याई पाहावो : बळी-भद्रासि कळले यकलाचि गेला देवो : मग घेउनि सकळ सामुदावो : नीगाला बळीरामु ॥२९॥ मुळ माहादेवी आपने : राहीला होता श्रीकृष्ण : तेथ वऱ्हाडिकेची आईत घेऊन : भेटला बळिराम ॥३०॥ चौदावा आध्याई पाहा..........॥३१॥...............पावला देवो ॥३२॥[५] तेथुनि पुढां पाठवीला सुदेवो : रुक्मिणीसी गुढीयरिसा जाला उत्सावो : तव सर्वेचि पावला देवो : कौंडन्यापुरासी ॥ ३३ ॥ तव साउभा भीमक यउनी : लागला देवाचा श्रीचरणीं : टावो दीधला आंबीकेभुवनी : तेथे जाला मेल्येकारू ॥ ३४ ॥ पंधरावा आध्याई देवासी : रुक्मिनी पाहुनर पाटविला आदरेसी : विचीत्र पाक करूनिया सखियासी : सवे देउनि पाटवीला सुदेवो ॥ ३५ ॥ मग देवो सकळ रुग्मिणीसमवेत : यादव पांड(व) समस्त : आरोगना सारूनि त्वरित : मग देवें वस्त्रें केलीं प्रधान ॥ ३६ ॥ ऐसी देवासि केली माहापुजा : देवीपासि आला विप्रराजा : मग सखियासि म्हणे भीमक आत्मजा : तुम्ही कैसा देखीला देवो ॥ ३७ ॥ सोळावा आध्याई श्रीआणंत : सखीयाही वर्नीला श्रीकृष्ण समर्थ : ते मूर्त्तवर्णन अईकुनि सद्गदित : जाली रुक्मीन देवी ॥ ३८ ॥ सतरावा आध्याई जाण : चैत्रें मांडीलें फळप्रदाण : भीमकें आर्धी यउन : पुजीला रावो मुरारी ॥ ३९ ॥ मग चैत्रे केलें फळप्रदान : तीयें वस्त्रें भावकळना पालटुण : आनिकें केली प्रधानें : देवी रुक्मीनीसी ॥ ४० ॥ चैत्राधि आपसकुन जाले : ते जोसीये वर्नीले : शीशुपाळ जाईल मार्गी आले : हळदी धुउनिया ॥ ४१ ॥ आटरवा आध्याई वीप्र सुदेवासी : देवें नीरोप सांधितीला देवीसी : जे उदेक यावें आंबीकेसी : यात्रामीसें ॥ ४२ ॥ यरीकडे रायें नगरासि नीर्वडी : दुर्गाभवतें सैन्य टेविलें माहांप्रोढी : तें आईकुनि रुक्मीनीसि

---

५. या ओव्यांतील चरणांचें पान मिळत नाही.

सांकडी : संकट क्रमिली रात्री ॥ ४३ ॥ मग उठोनि प्रातःकाळी : रुक्मीन आली मातेजवळी : ह्मने आज्ञा द्यावी जावया देउळी : यात्रे आंबीकेचिया ॥ ४४ ॥ मग सुधामती सांघे रायासी : राये राना पाटउनि देउळासी : गाभारा सोधुनि आला त्वरेसी : ह्मणे देवी पाटवावी यात्रे ॥ ४५ ॥ यकोनीसा आध्याई रुक्मीनी : यात्रे पाटविली आंबीकेभुवनी : तव रुक्मीयें वर्जीलें भीमकालागुनी : आजिची यात्रा न करावी ॥ ४६ ॥ तंव भीमकें धीःकारुनि रुक्मीयासी : यात्रे पा(ट)वीले रुक्मीनीसी : तीया जाउनि आंबीकेसी : पुजीलें शोडषोपचारी ॥ ४७ ॥ ऐसे आंबीकेतें पुजोनी : मग माडीवरी वेधली रुक्मीनी[6] : तव हाहाकार जाला आला श्रीकृष्ण : मग सैन्या खळबळ जाली ॥ ४८ ॥ आता आध्याई वीसावा : तो केवळ रुक्मीनीचा वीसावा : रथ प्रहरुनि रुक्मीनी आनि देवा : भेट जाली ॥ ४९ ॥ सैन्य पाहे टकमका : रुक्मीनि देवें नेली आईका : वार्तीकार घेउनि गेले हाका : ह्मणती नेली रुक्मीन ॥ ५० ॥ यकविसवा आध्याई आवधारा : रुक्मीनी नेली आपुलिया सैन्याभीतरी : धांगराघोळ करूनियां दुरी : जाउनि तुरे[7] वाजविती यादव ॥ ५१ ॥ तव शिशुपाळ विरामला : मग बंधु सैल्ये बोलिला : तुंचि त्राण करी वहिला : मी आनीण रुक्मीनी ॥ ५२ ॥ मग सकळ राये घेउनि : यादवांवरी आला पालानोनी : तेथ युध्ये जाले झोटधरनी : माहातुंबळें ॥ ५३ ॥ युध्ये जालें माहादारूण : भगीलें शीशुपाळ सैन्यें : मग कैसे संसारून जुझीनले[8] पाहा ॥ ५४ ॥ बाविसावा आध्याई आईका : जरासुतादि पौंडरिका : यादवीं त्रसविलें सकळीका : मग देवें वाईला पंचजैन्यू ॥ ५५ ॥ तेविसावा आध्याई अवधारीः पंचजैन्याचे निनादें वीरथ (प)ळाले झडकरी : मग आडवा रथ घातला झडकरी : शीशुपाळाकडे ॥ ५६ ॥ मग देवें शीशुपाळासी : युध्यी त्रासुनि पळविलें त्यासी : जीवें मारिला नाहीं कार्यासी : सोडीला तीयवेळेचा ॥५७॥ चोविसावा आध्याई पाहे : रुक्मीया वेंपन केला आहे : मग सोडीला देवराये : तो परवाहीरा गेला श्रुंघारवनासी ॥ ५८ ॥ म(ग) देवी म्हणे देवातें : जी उटवावे मृत्य सैन्यातें : देवें आमृतदृष्टी आवलोकुनि उटविले त्यातें : मग गेले जेथींचे तेथें ॥ ५९ ॥ भाटकल्याणकीर्त्तीकीन्नरें : तयासि करूनि मान्यता आदर : कवच फेडुनि दीधला पाहुनर : आनि दी पाटवनी ॥ ६० ॥ मग देवो सकळ सैन्यासी : आले मुळ माहादेवासी : भेट जाली यस्वदेदेवीसी : तेथ जाला मेल्येकारु ॥ ६१ ॥ पंचविसावा आध्याई आईका : मुळ माहादेवा यनें जालें भीमका : श्रीकृष्णाचा चरनी लागला देखा : मग भीमकी नेली मंडपासी ॥ ६२ ॥ मग दोन्ही मंडप विविस्वकर्मेणं : हळदी लागली वोहरालागुण : आतां प्रनावया जाती रुक्मीण : रावो यादवेस्वर ॥ ६३ ॥ सवीसावा आध्याई कोडें : परब्रह्माचें जालें वऱ्हाड : लज्ञा (ग्ना ?)ची वीधीवरकड : सर्वजालें यथावीधी ॥ ६४ ॥ च्यार दीवस सोहोळा : यथावीधी जाला गोपाळा : रुक्मीनी सहित भावकळा : देवो आला जाणवसा ॥ ६५ ॥ मग भीमकें माथा ठेविला श्रीचरनी : मज आज्ञा दीजोजी चक्रपानी : देवो म्हणती तुह्मी यनी : पाहावी द्वारावती ॥ ६६ ॥ आता सत्तावीसावा आध्या (या) भितरी : भीमकासहित देवो प्रवेशले द्वारकापुरी : तेथे मीरवनुक जाली राया मुरारी : मग प्रवेसले नीज-

---

६. या ठिकाणीं चरणांचें यमक जुळत नाही. त्यामुळे दोन ओव्या असाव्यात असें वाटतें.

७. पाहा : तेणें महाघोषगजरें । दुमदुमिति गिरिदरें ।
तव दलामाझि रणतुरे । आस्फालिली ॥
(राजवाडे ज्ञानेश्वरी : १–१३०).

८. पाहा : राजवाडे ज्ञानेश्वरी : १–१७०, १७१.

भुवनीं ॥ ६७ ॥ आटाविसा अध्या (या) माझारी : भीमका पाहुन्नर जाला विचीत्रापरी : आनि सकळ लोकासहित यादववीरी : दीधलीं वस्त्रें आळंकरनें ॥ ६८ ॥ मग भीमकासि दीधली पाटवनी : तो कौंडन्यापुरा जाउनी : राज्ये करिताति श्रीकृष्णरुक्मीनी : द्वारकेमाजी ॥ ६९ ॥

## समारोप

ऐसे हे रुक्मीनी सैवर : यकचीत्तें आईकती नारीनर : तयासि पावैल परमेस्वर : आनि चींतिले पावती ॥७०॥ जो भक्तकाज कैवारी ये श्रीदें रूळताति तोउरी : देवा तुं साच करीं : आनि तारी भववेथेपासोनिया : ॥ ७१ ॥ भववेथा महाकटीण : येनें सोखीला माझा प्राण : तुजवांचुनि मज आहे कवन : गान्हानें सांगावया ॥७२॥ माझीया आपराधाचीया राशी : भेदुनि गेलिया गगनासी : तुजवांचुनि हृषीकेशी : मज आहे कवन ॥ ७३ ॥ कवी संतोसमुणीने केला ग्रंथ : सैवरीं वर्नीला श्रीआणंत : तयासि संतोसमुनी वीणवित : दासभीलमटीं ॥ ७४ ॥

## प्रार्थना

जी जी मी पुर्वीपासौनी : आपराधीक सहस्त्रागुनी : ते आपराध घेउनि लिहिता लेखनी : प्रुथ्वीण पुरेचि जाना ॥ ७५ ॥ जयजय आगाधा आणंता : जय जय आनाथनाथा : दुर करी माझी भववेथा : तुं कृपावंत स्वामियां ॥ ७६ ॥ जय जय परब्रह्म पुर्ण कामा : जयजय स्वात्मारामा नीःष्कामा : वीनंती परेशावी मेघस्यामा : स्वयें शक्ती आणंदपुर्ना ॥ ७७ ॥ नमो कैवल्यघनकेशरी : नमो नमो जी साकार सौरी : मनुजाकृती धरूनि संसारी : चाळिसी ग्रहस्ताधर्म ॥ ७८ ॥ जे जे आपराध केले मीयां : ते उपसाहिजो[९] जी स्वामिया : हे भवव्येथा नासोनिया : मज रक्षी मायबापा ॥ ७९ ॥ जी जी मन कळलें आणंता : तुं उदास जालासि कृपावंता : ते आपराध उपसाहोनि आच्युता : रक्षी संतोसा भीलमठांतु[१०] ॥ ८० ॥ जी तुझें रुक्मीनी सैंवर : नीत्य पटन करीतो णीर्धार : औशधाचा वीचार : तर घेतो चरणोदक ॥ ८१ ॥ मनोर्थ स.........( ८३ आणि ८४ या ओव्यांचें पान नाही. ८५ वी ओवीहि अपुरी. )...... सर्वत्र पुरती जाना ॥ ८५ ॥ ईती लघु रुक्मीनी सैवर संपुर्ण समाप्त ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ : श्री : ओमीत्यकाक्षरं ब्रह्मव्याहरन्मामनुस्मरन् । यः प्रयातित्यजन्देहंसैय्याति परमांगति ॥ १ ॥ सर्वतः पानीपादंतत्सर्वतोक्षीसीरोमुखं । सर्वतश्रुतीमन्लोकेसर्वमाव्रुततीष्टती ॥ २ ॥ स्थानेहृषीकेसतवप्रकीर्त्याजगत्प्रहृश्यत्यणुरज्यत्यच । रक्षांसी भीतानि दशोद्रवंती सर्वेनमस्येतिच सीद्धसंधाः ॥ ३ ॥ कविंपुरानमनुसासीतारमनोरंनीयांस्मृरनस्मृरद्य । सर्वस्यधातारमचींतरूपमादीत्यवर्नातमशः परस्तात् ॥ ४ ॥ उर्द्धमूलमधः शाखमश्वतः प्राहुरव्ययं । छंदासियस्यपर्नानीयस्तंवेदसवेदवित् ॥ ॥५॥ सर्वस्यचाहुः हृदिसन्यीष्टोमतः स्मृतीर्ज्ञानमपोहनंच ॥ वेदेश्वसर्वेरहमेववेद्योवेदांतकृद्वेदविवेदचाहं ॥ ६ ॥ मन्मनाभवमद्भक्तोमद्याजिमांनमस्कुरू । मामेवैस्येसियुक्तैवमात्मानंमत्परायनाः ॥७॥ इति श्रीभग्वद्गीतासुपनेसत्सुब्रह्मविद्यायांयोगसास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ब्रह्मविद्भाषसप्तस्लोकी गीता समाप्ति ॥ छ ॥ छ ॥ छ ॥

---

९. देवा तूंचि गणेशु । सकलार्थ प्रकाशु । म्हणे निवृत्तिदासु । **अवधारिजो** ॥ ( रा. ज्ञा. १–२ ).

१०. सैजा सींहु **गजघटाआंतु** । ( रा. ज्ञा. १–१६२ ). ' आंबांतु घाली : खीरी आंतु घाली ' ( दृ. ६४ ).

फलश्रुति

द्वापारी रूक्मीणि सैवरकथा श्रीकृष्ण वीव्हावो हा :
नीत्यानी पठतील काव्यवरदीजे रोग जाती माहा :
पुत्रसंपतिलक्षमी प्रसवक हा ग्रंथ आईकीलीया :
कल्पीलमनीकल्पवृक्षफळ दे श्रीकृष्णदत्तात्रया ।। १ ।। छ ।। छ ।।

## यादवराजांचा महानुभावांना आश्रय

देवगिरीच्या यादवराजांची शके ११०९ पासून १२४० पर्यंतची कारकीर्द ही निरनिराळ्या कारणांमुळे वैशिष्ट्यपूर्ण ठरलेली आहे. ज्ञानेश्वरांनी उल्लेखिलेला रामदेवराव यादव हा शके ११९३ ते १२३१ च्या सुमारास राज्यावर होता. संतोषमुनीच्या काव्यांत ज्या भिल मठाचा उल्लेख आहे, तो बांधविणारा यादव राजा भिल्लम हा शके ११०९ ते १११३पर्यंत राज्यावर होता. यानेच देवगिरी ही आपली राजधानी केली. यादव राजांत भिल्लम हाच मोठा पराक्रमी राजा होता व त्याने सार्वभौम राज्याची स्थापना केली. भिल्लम व त्यानंतरचेहि यादवराजे विद्याकलांना उत्तेजन देणारे व गुणिजनांचा यथायोग्य गौरव करणारे रसिक होते. त्यांची धार्मिक दृष्टि उदारपणाची होती. नाथपंथ, आदिनारायणपंथ किंवा महानुभावपंथ या सर्वांना सारख्याच रीतीने त्यांनी आश्रय दिलेला होता. भास्कराचार्यासारखे ज्योतिषी आणि त्याचेच वंशज लक्ष्मीधर, चांगदेव हे यादवराजांचे आश्रित होते. 'विवेकसिंधु'कार मुकुंदराज हा यादव राजा जैत्रपाळ याचा गुरु होता. 'चतुर्वर्गचिंतामणी'कार हेमाद्रिपंत आणि त्याचा मित्र भागवतावर टीका लिहिणारा बोपदेव हेहि रामदेवरावाच्या काळांत होऊन गेले. अशा तऱ्हेने विद्या, कला यांना उत्तेजन देणारी यादवांची कारकीर्द गुणिजनांच्या उत्कर्षास सहायभूत झाली आणि याच काळांत मराठींतील महत्त्वाची ग्रंथरचना झाली. बाराव्या शतकाच्या अखेरीअखेरीस महानुभाव पंथाचा प्रभाव सर्वत्र पडत चालला होता. यादव राजांनीहि या वेळीं त्यांना योग्य तें साहाय्य केलें. शके ११६९ ते ११८२ या काळांत राज्यावर असलेला कृष्णदेव ऊर्फ कन्हरदेव याचा महानुभावांना चांगलाच आश्रय होता. "तो आपल्या धाकट्या महादेवरायासह लोणारास श्रीचक्रधरस्वामींच्या दर्शनास जात असे."[११]

## यादवकालीन भाषा

भाषेच्या दृष्टीने हें छोटेसें महानुभावीय काव्य वैशिष्ट्यपूर्ण आहे. यादवकालामध्ये निर्माण झालेल्या वाङ्मयांत जीं भाषाविषयक वैशिष्ट्यें आढळतात, त्यांचाच आढळ या ठिकाणींहि होतो. भाषेतील वर्णप्रक्रिया, उच्चारप्रक्रिया, तद्धितप्रक्रिया, विभक्तिप्रत्यय व शब्दयोगी अव्ययें, उभयान्वयी अव्ययें, सामान्यरूप कायम राहणें या सर्व बाबतींत यादव-मराठीच असल्याचें हें हस्तलिखित सिद्ध करीत आहे. भाषेचें स्वरूप ठरवीत असतांना त्यांतील अव्ययांचा प्रामुख्याने विचार केला जातो; तींहि या लघुकाव्यांत अस्सल यादवकालीन असल्याचें दिसून येतें. संतोषमुनीच्या 'रुक्मिणी-स्वयंवरा'ची रचना शके १४७५-७६ त झाल्याचा उल्लेख वर आलाच आहे, म्हणजे एकनाथकालीनच हा कवि होता. परंतु या काव्यांतील भाषा पाहतां त्यांत एकनाथकालीन वाङ्मयांतील प्रमुख भाषाविषयक वैशिष्ट्यें न दिसतां ती तत्पूर्वी निदान शंभर वर्षांची असावी असें दिसतें. मूळ विस्तृत 'रुक्मिणी-स्वयंवरा'ची पोथी उपलब्ध नसल्याने

११. 'मराठी भाषा-उद्गम व विकास' (प्रथमावृत्ति : पृष्ठ १८०).

कालनिर्णय निश्चितपणें करतां येत नाही; परंतु या हस्तलिखितांतील भाषेवरून संतोषमुनि हा शके १४७५–७६ च्या पूर्वी निदान ५० वर्षे होऊन गेला असला पाहिजे, असें मला वाटतें. यादवकालीन भाषेंत मराठीचें अस्सल स्वरूप दिसतें. देशी शब्दांचा वापर त्यांत जास्त आहे. बहामनीकालीन भाषा अधिकाधिक संस्कृतप्रचुर होऊं लागली होती. मराठी भाषा नागर, प्रौढ बनूं लागली होती. तिचें खरें सुटसुटीत स्वरूप यादवकालांतच पाहावयास मिळतें. संतोषमुनीच्या 'लघु रुक्मिणी स्वयंवरां'त भाषेचें मराठमोळेपण स्पष्ट दिसतें. विदी, येळाइतु, वन्हाडिक, आईत, साउमा, मेल्येकारू, निर्वेडी, वार्तीकार, वरकड, तोडरी, तुरे, परेशावी, उपसाहिजो इत्यादि शब्द व आरोगना सारणें यासारखे वाक्प्रचार ज्ञानेश्वरांच्या किंवा महानु-भावीयांच्याहि ग्रंथांतून आढळतात. जास्तींत जास्त मराठी शब्दांचा वापर या काव्यांत करण्यांत आलेला आहे.

## द्विवचन

यादवकालीन मराठी भाषेंत एकवचन व बहुवचनाप्रमाणेच द्विवचनहि क्वचित् प्रचारांत होतें. याचें श्री. राजवाडे यांचें एक व आपलीं सुमारें ९।१० अशीं उदाहरणें डॉ. तुळपुळे यांनी ' यादवकालीन मराठी भाषा ' या आपल्या पुस्तकांत पृष्ठ १५६–१५७ वर दिलीं आहेत. द्विवचनाचीं द्विभावदर्शक नामांचीं कांही रूपें क्वचित् वापरण्यांत येत. हा संस्कृतचाच प्रभाव असावा. या लघुकाव्यांतील २५ व्या ओवींतसुद्धा असेंच एक द्विवचनाचें रूप आढळतें.

ठाई ठाई नक्षेत्रलता : आनि चंद्रसूर्यो झळकती :

यांतील ' चंद्रसूर्यो ' हें प्रथमेचें द्विवचन असणारें रूप तत्सम असलें तरी यादव-मराठींत होणाऱ्या द्विवचनाशीं जुळणारें आहे. या ठिकाणींसुद्धा द्विभावदर्शक नामांची जोडी असून तिचें द्विवचनाचें रूप तयार करण्यांत आलें आहे.

## उभयान्वयी अव्यय

शब्दयोगी अव्ययाचीं माजि, माझारीं, भीतरीं अशीं सप्तमीचीं रूपें पुढे दिलीं आहेत. अव्ययांचीं हीं रूपें भाषांचें कालिक स्वरूप निश्चितपणें दाखवूं शकतात. संतोषमुनीचें ' लघु रुक्मीणी सेंवर ' हें यादवकालीन असल्याचा आणखी एक पुरावा या काव्यांत आहे. या काव्यांतील ४२ वी ओवी अशी आहे—

आटरवा आध्याई वीप्र सुदेवासी : देवें नीरोप सांघितीला देवीसी : जे उदेक यावें आंबीकेसी : यात्रामीसें ॥

यांतील ' जे ' हें ' कीं ' या अर्थाचें उभयान्वयी अव्यय यादवकालीन आहे. यासंबंधी इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांनी दिलेलें मत उपोद्बलक ठरणारें आहे. आपण संपादिलेल्या ' ज्ञानेश्वरी 'च्या प्रस्तावनेंत कै. राजवाडे म्हणतात, " ज्या अर्थी मुकुंदराजी ज्ञानेश्वरींत फारसी शब्द नाहीत, त्या अर्थी ज्ञानेश्वरकालीन म्हणून नांवाजलेल्या कोणत्याहि अस्सल लेखांत प्रायः फारसी शब्द येणें दुर्मीळ आहे. तशांत, फारसी उभयान्वयी अव्ययें ज्या ज्ञानेश्वरकालीन म्हणविणाऱ्या ग्रंथांत येतील, तो लेख अर्वाचीन म्हणजे मुसलमानी रियासतींतला बिनधोक समजावा...फारसींत ' के ' असें उभयान्वयी अव्यय आहे. त्याचें मराठी की, कीं, कीँ, हें कीँ अव्यय रामदास व शिवाजी यांच्यानंतर रूढ झालें. ज्ञानेश्वरकालीं व ज्ञानेश्वराच्या-

पूर्वी फारसी 'की' किंवा इंग्रजी that या उभयान्वयी अव्ययाच्याबद्दल जे, जें असें उभयान्वयी अव्यय नियमानें योजीत. "[१२]

" कीं " या उभयान्वयी अव्ययाप्रमाणेच ' व ' हें उभयान्वयी अव्ययसुद्धा फारसी-मधूनच मराठींत आलें आहे. या लघुकाव्यांत एकाहि ठिकाणीं ' व ' हें अव्यय आलेलें नसून त्याऐवजी सर्वत्र ' आनि ' चाच वापर करण्यांत आला आहे. ( उदा.—आनि दी पाटवनी ॥ ६० ॥, आनि चींतिलें पावती, आनि तारी भववेथे पासोनिया ).

या हस्तलिखितांत ' °ळ '-काराचा वापर सर्रास करण्यांत आलेला आहे. " सैन्या खळबळ जाली ' अशा ठिकाणीं प्रत्यय न लागतां सामान्यरूप कायम राहिलें आहे. ' संकट क्रमिली रात्री ', ' श्रीकृष्णाच्या चरनीं लागला देखा ' हीं रूपेंहि ध्यानांत घेण्याजोगीं आहेत.

या लघुकाव्यांत आढळणारीं यादवकालीन भाषेंतील शब्दांचीं कांही रूपें पुढे देत आहे :—

### नामविभक्तिप्रत्यय

प्रथमा—एकवचन—१. सागरू, बळीरामु, मेल्येकारू.
२. सुदेवो, देवो, सामुद्रवो, उत्सावो, रावोमुरारी, वीव्हावो.
द्विवचन—चंद्रसूर्यो.
तृतीया—रायें, रुक्मीयें, जोसीवें, आदरेंसी, देवें, देवरायें.
चतुर्थी—देवासी.
षष्टी—आंबीकेचिया, देवाचा( च्या ), श्रीकृष्णाचा( च्या ), आध्यायाचे, भक्ताचा.
सप्तमी—मटांतु, आंबीकेभुवनीं, देउळीं, रायांगणामाजि, सैन्याभीतरीं, अध्यायामाझारी.
संबोधन—वो.

### वर्णप्रक्रिया : व्यंजनें

१. अल्पप्राण मृदु—नीगाला ( घा ).
२. महाप्राण मृदु व कठोर—सोखीला ( ष ), सांघे ( ग ), श्रृंघार ( ग ).
३. अनुनासिकें : न >< ण
णववा, ज्ञाण, णवही, फळप्रदाण, जाणवसा, णयनीं, णीर्धार.
ण >< न
संपुर्न, वर्नील, आनि, श्रीचरनावरी, कौंडन्यापुरासी, ज्ञाने, रुक्मीनी, चक्रपानी, मीरवनुक, सहस्रफनी.

### वर्णप्रक्रिया : स्वर

१. न्हस्व स्वर—ऋक्मिणी ( रु ), रुषी ( ऋ ), पृथ्वी ( ऋ ). यकलाचि, यउनी, पुजीला, यने, यकचीत्तें.
२. संयुक्त स्वर—उदैक ( उदईक ), पावैल.
३. दीर्घ स्वर—दाहाविया, आय्याई, सांगीतीली, आकरावा, द्वीजराये, तीथ ( तिथे ), नक्षेत्रलता, माहादेवी, आमृतदृष्टि, आळंकरने, सामात, सैन्ये.

१२. राजवाडे-ज्ञानेश्वरी, प्रस्तावना : पृष्ठ १०५.

४. ऊष्में—प्राकृतांत 'श' चा 'स' नियमाने होई. यादव–मराठींत 'श-स'-मध्ये अभेद असलेला दिसतो.[१३]

५. वर्णसंयोग—प्रव्हानि ( वह ), प्रधान ( परि ), प्रणावया ( परि ).

६. वर्णवियोग—वेथेपासूनिया ( व्य ).

७. स्वरभक्ति–वर्णागम—मूळ शब्दांत उच्चारसौकर्यासाठी एखादा वर्ण जास्त येतो. यादवकालांत स्वरभक्ति मोठ्या प्रमाणांत होती.

अईकुनि, आईका, आईकती, आईकीलीया, पंचशैन्यू.

## तद्धितप्रक्रिया

१. इक ( < सं. इक < अप. इक ) वऱ्हाडिक ( सोइरिकप्रमाणे ).

२. इत—येलाइतु ( रिणाइतुप्रमाणे ).

३. कारू—मेल्येकारू.

## उच्चारप्रक्रिया

यादव-मराठींतील 'य' श्रुति, 'व' श्रुति इथेहि झाली आहे. उदा० देवरायें, रायें.

व-श्रुति–विवाह-विव्हावो अशी झाली आहे.

'पाहुनेर' यासारखी 'प्राघूर्ण'पासून तयार झालेली उपान्त्य स्वराची उच्चार-प्रक्रियाहि इथे आढळते.

त्याचप्रमाणे 'सैंवर' ( स्वयंवर ) सारख्या शब्दांत ऐ < अ + इ असे संयुक्त स्वर येऊन मूळ रूपांत बदल होण्याची यादव-मराठींतील लकब येथेहि कायम आहे.

## क्रियापदें

भूतकाळ—पाटवीले, जुझीनले, त्रसविलें, वाईला.

वर्तमान—उटवावे. भविष्य–पावैल.

विध्यर्थ—दीजे, उपसाहिजो ( इज प्रत्ययान्त ).

पौनःपुन्यदर्शक—धांगराधोळ.

यादव-मराठीमध्ये सामासिक क्रियारूपांची सुरवात झालेली होती.[१४] त्याचें येथील एक संयुक्त क्रियापदाचें उदाहरण–करीतायें. 'मनोर्थ' यासारखा व्यंजनसंधीहि क्वचित् आढळतो.

विचाराची एक दिशा म्हणून यादवकालीन भाषेचीं वैशिष्ट्यें या छोट्याशा काव्यांत कशीं दिसतात, तें दाखविण्याचा मीं प्रयत्न केला आहे. भाषेचीं हीं सर्व रूपें पाहिल्यानंतर संतोषमुनी कृष्णदास हा एकनाथकालीन भाषेचा वारसा सांगणारा नसून, तत्पूर्वीची यादव-कालीन मराठमोळी भाषा वापरणारा आहे, हें दिसून येतें. ● ● ●

---

१३. पाहा—या. का. मराठी भाषा ( पृष्ठ ११३-११४ ).

१४. पाहा—यादवकालीन मराठी भाषा ( पृष्ठ : २५७–२५८ ).

डॉ. सरोजिनी बाबर

# लोकगीतांतील "भलरी"

आपल्या मुलखांत एखादी गोष्ट घडलेली नसली किंवा आपल्या पाहण्यांत ती कधी आलेली नसली, म्हणजे तिच्या दर्शनानं माणूस भांबावून जातो; तसा कांहीसा प्रकार परवा माझ्या बाबतींत झाला. माझ्या समोरची घडती गोष्ट बघून मी खरंच भुलून गेलें. एखाद्या सर्कशीमध्ये अद्‌भुत चमत्कार बघून डोळे दिपून जावेत तस्सं मला झालं. खुळ्यासारखी टक लावून मी बघत राहिलें. मला कशाचं म्हणून कशाचंहि भान राहिलं नाही....

म्हणजे त्याचं असं झालं की, मी बसलेंवतें आमच्या शेतांतल्या पालापाचोळ्यांत उसाचं कांडं चघळीत; आणिक माझ्यासमोर एक मध्यमवयाची बाई वाऱ्यासारखी हालून नाचत होती, गात होती. ऐन उमेदीला आलेलं शेतांतील पीक काढायचा आव आणीत ती हातांत नसलेला कोयता त्या समोर नसलेल्या पिकावरून फिरवीत होती ! नव्या नवतीच्या पिकानं शृंगारलेल्या शेताचा भास माझ्यापुढं उभा करीत तिनं 'भलरी' घातली होती ! वरच्या पट्टींतील गोड आवाजानं तिनं सारं शिवार घुमवून टाकलं होतं; आणि मुख्य म्हणजे बायका देखील भलरी घालतात ह्या प्रात्यक्षिकानं तिनं माझ्या कल्पनेला जबरदस्त धक्का देऊन सोडला होता !.... कोकणांतील बायका भाताची उपसाभर करतांना म्हणतात तें गाणं ती मोठ्या दिमाखानं रंगवून खुलवून म्हणत माझ्यापुढं नाचत होती ! तिचा हावभाव माझ्या डोळ्यांत मावत नव्हता !...

म्हमईला जाईन पुन्याला येईन
पाताळ नेसीन मी
नको मला तुमची बांडाची लुगडीं
उघडीच बसीन मी
आत्याबाई फाटकंच नेसीन मी

म्हमईला जाईन पुन्याला येईन
पोलकीच घालीन मी
नको मला तुमच्या बांडाच्या चोळ्या
तशीच बसीन मी
आत्याबाई फाटकंच नेसीन मी

म्हमईला जाईन पुन्याला येईन
तारबिंडल ( बांगडी ) भरीन मी
नको मला तुमची काळी कांचकांडं
चिंधीच बांदीन मी
आत्याबाई चिंधीच बांदीन मी

म्हमईला जाईन पुन्याला येईन
जिलब्याच खाईन मी
नको मला तुमची भाताची ढिचकी

अनुक्रमणिका

उपाशीच राहीन मी
आत्याबाई उपाशीच राहीन मी

म्हमईला जाईन पुन्याला येईन
गाद्यागिरद्या घेईन
त्यावरच निजन मी
नको मला तुमचं फाटकं लक्तर
भुईलाच लोळीन मी
आत्याबाई भुईलाच लोळीन मी

म्हमईला जाईन पुन्याला येईन
गोरा न्हवरा पाहीन मी
नको मला तुमचा काळा काळा मुलगा
तशीच राहीन मी
आत्याबाई तशीच राहीन मी

आणि ह्या गाण्यानं माझ्या काळजाला ठावठिकाणा उरला नव्हता! म्हणून "बायकांनीं कष्टाचं ओझें कमी करायला गीत गावं पण असलं? एवढं पुढं जाऊन? मोकळीक मिळाली म्हणून वाट्टेल तें म्हणावं?" त्या बाईला मी असं थोडं रागानंच विचारलं तेव्हा ती हसून म्हणाली कशी, "अवो, भलरी म्हनायची ती हसत खेळत काम करावं म्हणून. मज्जा वाटावी म्हणून. चार गोष्टी बडबडून हसूं यावं म्हणून. तर ह्यांत काय कुठली सून खरंच सासूपुढं जाऊन असं म्हनील काय? छाद् छाद्! न्हाईबा! ही आपली शेतांतली गंमत. जिवाला इरंगुळा म्हणून गाइलेली. बायकाबायकांत. लई राग आला असल तर दुसरी म्हणतें. मावळांत बायका म्हनत्यात ती हं!" आणि तिनं माझा होकार यायच्या आधींच सुरवात पण केली देखील—

भलरी भलरी
भलरी म्हन ग मैना
मला भलरी म्हनतां येइना
पाण्याला जारे राघू
मला घागर आनतां येइना
भलरी म्हन ग मैना
मोत्या पवळ्यांची वटी
माज्या पेरीली शेतीं
राजा भलरी भलरी
भलरी घालूं किती
मोत्या पवळ्यांचा मेवा
हौशा माज्या ग जावा
राजा भलरी भलरी
भलरी घालूं किती

ही भलरी मला आवडली म्हणून मी समाधानानं मान डोलावली आणि जोरानं उसाचा एक घास तोंडीत चघळला तशी ती बाईच पुन्हा म्हणाली, " ही छान हाय. मगाची

पन चांगलीच. का म्हनशीला तर म्हमईला जायाला मिळत न्हाई. पुणं गांव बघाय घावत न्हाई. म्हणून तिथलं कुनाकुनाकंडं तरी ऐकलं असल तें यांचं जोडून गितांत! काय? कुनीकंडं तरी हालकं वाटून उम्मीद वाटायशी कारन. जिवाला करमनूक तरी कशी करावी न्हाई का? अवो, ही आत्ताची भलरी बायका एका जोडीनं गायला लागल्या न् ऐकलं तर नाग डुलावा पुंगीनं तस्सं झालंच पाइजे. गळा झक्कास असतो."

आता मात्र माझ्या मनांत पहिल्यांदा आलेला राग निवळला आणि भलरीची मजा चाखण्यांत मीहि दंग झालें. एवढंच नाही तर लोकगीत हें आदिमानवाचं उल्हासमय संगीत आहे याची खात्री मला पटली आणि—

राघू करड देशीचा
मैना बंगल्या बागाची
पिरत पडली दोगांची
जाळी येडिली वागाची

याचा किंवा—

घे भाऊ भलरी घे
भलरी बाजा लावलाय का
रंगू पाह्यलाय का
देहूला साधू गेलाय का
संगं वीणा नेलाय का

याचा अर्थहि मनांत भरूं लागला. गोडी वाटूं लागली आणि मग कुणाकुणाकडून तरी 'भलरी दादा भलगडी दादा' ही ऐकलेली कविता लक्षांत येत गेली. पुरुषांनी शेतांत घातलेल्या भलरीला देखील अशीच गोडी असली पाहिजे हें तेव्हा मला पटलें.

त्यानंतर मग मिळतील तेवढी भलरी गीतें जमवायचा मी सपाटा लावला. कोण म्हणणारें भेटलें की मन लावून ऐकायचा छंद मग मला जडत गेला.

शाळू काढतांना पुणें भागांत घातलेली भलरी मी एकदा खरी खरी ऐकली. पीक निघतांना किती आनंदानं निघतं, लक्ष्मीच्या रूपानं घरीं येतांना किती उल्हासतं, याचा डोळ्यादेखत अनुभव घेतला. त्या वेळीं खूप आनंद वाटला. चारसहा माणसं खेळीमेळीनं न कंटाळतां दरघडीला नव्या दमानं गात काम करतांना बघून अचंबाहि वाटला.

भलरी हो भलरी
भलरी गडी दादा
शाबास तुझी हो
भलरी गडी दादा
जोडीदारा हो भलरी
भलरी गडी दादा

मोठ्या रुबाबानं गोड गळ्यावर एकानं अशी ललकारी मारली की, इतरांनी त्याच शब्दांत उलट घातलेला साद ऐकला म्हणजे ऐकणारा भुलून जातो; आणि एकमेकांनी एकमेकांना प्रेमानं उत्तेजन देत कामाचा उरक जलदीनं व्हावा म्हणून योजलेल्या या उपायानं त्यालाहि हुरूप चढतो. शिवाय—

व्हय रं गड्या दादा
माझ्या सजना हो
हरी रामा, भलरी गडी दादा
शाब्बास तुझी दादा
दादा सजना हो
हरी रामा, भलरी गडी दादा

असं म्हटल्यावर तर ऐकणारं माणूस स्वतःहि त्या लोकांच्या बरोबर गुणगुणूं लागतं ! एवढंच नव्हे तर टाळीनं ताल धरून त्यांच्या कामांत सामील व्हायलाहि तें उतावीळ होतं ! ह्या गाण्यांचा गुणच तसा आहे. साधंच बोलणं पण मोठं देखणं, शाब्बासकी देणारं. त्या कारणानं सर्वांना गोडी वाटते.

रामा हो रामा रामा रामा
रामाच्या बागामंदीं
चावऱ्या मोटा दोनी
हाकीती हौशा धनी
जाईला जातं पानी
झुळुझुळु मंजुळवानी
आंबाची सावली चिंचवरी
रामाचं ध्यान गेलं सीतावरी

हें गाणं त्या माणसांच्या ओठांतून निघालं तशी एकदम निराळी चाल पुढं आली. भावना खुलली, रामसीतेच्या गोष्टीनं आणखीनच उभारी आली. हात वाऱ्याच्या गतीनं हलूं लागले. मधूनच माणसं नाचूं लागलीं. वातावरण एकदम आनंदलं; आणि मग—

गाडीच्या गाडीघाना
दोन बैल हौसेची
गळ्या घुंगुरमाळा गोंड रेशमाची
ह्येच्या बागंत बंगला
हिरव्या रंगाचा
वर पिंजरा टांगीला
राघू मैनांचा
नार घेती झुल्यावर वारा मौजेचा

असलं गाणं निघाल्यावर तर भलरी गाणारे गडी भारीच खुलले...भलरीला रंग भरत निघाला. प्रीतीच्या गोष्टींनी सारं वातावरण नखरेल बनत गेलं...माणसाला स्वतःचंहि भान राहिलं नाही, एवढ्या रुबाबानं भलरी पुढं पुढं रंगत निघाली...

लाल चोळी कुसंबी ग लाल
तुझ्या नथीला देतो ढाळ
सजणे नाकामधीं संबाळ
लाल चोळी कुसुंबी ग लाल
तुझ्या डुशीला देतो ढाळ
सजणे गळ्यामधीं संबाळ

आणखी या ढंगांत झुबा, वाकी, पाटली, तोडे असले सारे सारे दागिने गोळा होऊन थरच्या राणीला खूष करणारं पीक निघाल्याचं समाधान त्याच्या चेहऱ्यावर तरळूं लागलं.

त्या दिवसानंतर मग फार दिवस भलरी कुठं उमगली नाहीं. विशेषकरून तिचा कुठं पत्ता लागला नाही. पण एक दिवस एका भल्या माणसानं मला तिचा नगरी मुलखांतला थाट ऐकवला. त्या वेळीं मोठी गंमत आली. हसून हसून जीव बेजार झाला. त्या भलरीचा थाट असा होता—

बाभळ बाईचा बाईचा हिरवा पाला
कोण्या देशीचा देशीचा जोगी आला
त्याची किंगरी किंगरी नानापरी
लेक द्यायाची द्यायाची कोणा घरीं
लेक द्यायाची द्यायाची बामण घरीं
बामणा घरीं न ग माय सडा टाकितां पराण जाय

आणि ती भलरी मोठी लांबलचकहि होती. दरवेळीं या पहिल्या सगळ्या ओळी तशाच म्हणून मग मारवाड्याच्या घरचं वुरखा घेणं, गुजराघरची उलटी साडी, तेल्याघरचा घाणा हाकणं, तांबोळ्याघरचीं पानं मोजणं, लोहाराघरचा भाता फुंकणं, घिसाड्याघरीं घण मारणं, साळ्याघरीं लुगडीं विणणं, माळ्याघरीं फुलं वेंचणं, कुंभाराघरीं मडकीं घडविणं, सुताराघरीं लांकडं तासणं, शेतकऱ्याघरीं शेत खुरपणं, धनगराघरीं मेंढ्या राखणं, चांभाराघरीं मोटा शिवणं, वडाराघरीं दगड फोडणं वगैरे कारणं सांगून लग्नाला मोडतां घालीत शेवटीं आपल्याच जातींत पै पाहुण्यांत लेक देणं चांगलं या निर्णयांत ही भलरी संपते. या गीतांतील कारण-मीमांसेच्या कारणानं हसूं येऊन ही भलरी म्हणणारांना मोठी मौज वाटते, ऐकणाराला हसूं फुटतें.

प्रत्येक मुलखाची भलरी वेगळी. तिचा थाट निराळा. कल्पना आगळी. पण तिच्या मागची भावना एक. काम करतांना उत्साह यावा, उमेद वाटावी.

कुठं कुठं झाड वा रोप लावतांना पण गाणीं गातात. ह्या गाण्यांना कुणी भलरी म्हणतात, कुणी म्हणत नाहीत. तरी पण उत्साह तोच असतो. काम आनंदानं व लवकर उरकावं ही गीतामागची भावनाहि सारखीच असते. नमुना म्हणून परवा मी एके ठिकाणीं ऐकलेलं डांगी मुलखांतील नारळीचं झाड लावतांना म्हणायचं गीत असं आहे—

चांदणारी चांदणा टिपरुस चांदणा
निर्मळ अंगणा
बारीक लावणी कशाची
रामा बारीक लावणी कशाची
बारीक लावणी सुपारीची
सुपाऱ्या लावल्या हरोहरी
आतां बया झाल्या घरोघरीं
रामा बया झाल्या घरोघरीं
नारळी लावल्या हरोहरीं
आतां बया झाल्या घरोघरीं
रामा बया झाल्या घरोघरीं

हळदी लावल्या हरोहरी
आतां बया झाल्या वरोबरीं
रामा बया झाल्या वरोबरीं
कचोर लावले हरोहरी
चांदणारी चांदणा टिपरुस चांदणा
निर्मळ अंगणा

भलरी ही अशी आहे. तिच्याबद्दल बोलावं तेवढं थोडं. सांगावं तेवढं कमी. वाटेल तो विषय तिच्यांत सामावतो. हवी ती भावना ती रंगवते; आणि न लाजतां न मुरकतां ती बेशक सांगू शकते की—

सुटलाय वारा लावलाय फरारा
ह्यो वारू गेला कैलासी बंदरा
गेलाय कैलासी बंदरा नारी लागे निद्रा
तूं माझी जाई ग मी तुझा मोगरा

आणि मग त्या नादांत माणसं अशीं बेभान होऊन नाचूं लागतात कीं, त्यांच्या पायाखालची धूळ स्वर्गलोकीं जाऊन सूर्यदेव गदळलेला दिसूं लागतो ! आंघोळीसाठी त्याला मग दुधातुपाचं तळं शोधावं लागतं !

त्या भलरींतून असलं कांहीं कानावर आलं म्हणजे तर अशा अद्भुत चमत्कारानं मनाला एवढी भूल पडते की बस्स ! एकसारखी भलरी कानावर यावी आणि असा चमत्कार घडविणाऱ्या गोष्टी ऐकतांना मनाला दावून चटका लागावा, त्याखेरीज जिवाला शांति मिळायचीच नाही असा मग भास व्हायला लागतो ! आणि कहाणीच्या वरताण भलरीचं खुळं लागून माणसं मग तिची पाठ सोडायला राजी होत नाहींत !...तिच्या सहवासांतच त्यांना परमानंद मिळूं लागतो ! ● ● ●

डॉ. गं. व. ग्रामोपाध्ये

# मराठीच्या ऐतिहासिक व्याकरणाविषयी

मराठी भाषेचीं आजवर लिहिलीं गेलेलीं व्याकरणें हीं मुख्यतः शिष्टमान्य ग्रांथिक भाषेचीं आहेत. मराठीच्या ज्या अनेक बोली आहेत, किंवा ( ग्रांथिक ) प्रमाण भाषेच्याहि ग्रंथगत न झालेल्या ज्या कांही लकबा आहेत, त्यांचा परामर्श व्याकरणकारांनी घेतलेला दिसत नाही. परंतु मराठी भाषा आजवर जिवंत राहिली आहे ती तिच्यांत केवळ महत्त्वपूर्ण ग्रंथ निर्माण होत आले म्हणून नव्हे, तर महाराष्ट्र समाजांतील अठरापगड जाती आपला बोली-भाषिक-व्यवहार तिच्यांतून करीत आल्या म्हणून. भाषेच्या प्रमाण ग्रांथिक स्वरूपाइतकेंच तिच्या बोली स्वरूपालाहि महत्त्व असतें तें यामुळे. प्रमाण ग्रांथिक भाषा ही त्या विशिष्ट भाषागटांतील निरनिराळ्या बोलींचीच परिणत अवस्था असते, ही गोष्ट खरी; परंतु ती प्रमाणरूप धारण करीत असतांनाच हळूहळू आपल्यांतील खास बोलींचे कंगोरे कमी करीत जाते, आणि कालांतराने बोलींच्या स्वरूपाहून कांहींसें भिन्न रूप धारण करते. यामागे निरनिराळ्या प्रादेशिक बोली-भाषिकांना आपलें स्वरूप सारख्याच प्रमाणांत स्पष्ट व्हावें हा एक तिचा हेतु असतोच. मात्र या आणि तिच्या इतर जीवनप्रेरक हेतूमुळे ती दिवसेंदिवस बोलीभाषांहून भिन्न होत जाते याविषयी शंका नाही. तशांत तिला ग्रांथिक स्वरूप देऊन सुप्रतिष्ठित करणारे ग्रंथकार व त्यांचे ग्रंथ जर मोठ्या योग्यतेचे असतील, तर त्यांच्या प्रभावाने त्यांनी योजिलेल्या ग्रांथिक भाषेला जशी बहुजनमान्यता लवकर मिळते, तशीच शिष्टमान्यताहि तिला सहज मिळूं शकते. व्याकरणकारांच्या नजरेंत मुख्यत: भरते ती ही शिष्टमान्य ग्रांथिक भाषाच; आणि मग ते या शिष्टमान्य ग्रांथिक भाषेवरच शास्त्रशुद्धतेचा शिक्कामोर्तब करतात व भाषेंतील तदितर प्रयोगांना पर्यायाने अशिष्ट व ग्राम्य म्हणजेच अप्रमाण ठरवितात. वस्तुत: बोली भाषांनाहि त्यांचें असें स्वतःचें रूप असतें, स्वतःचें अंगभूत व्याकरण असतें. त्यांच्या त्यांच्या भाषिक गटांत बोली व्यवहारांत त्यांना महत्त्वहि असतें. परंतु ग्रांथिकतेच्या बाबतींत त्या मागे पडतात. प्रमाण ग्रांथिक भाषा आणि तिच्या मूळ बोली-भाषा यांच्यांतील दुरावा पक्का होतो तो या रीतीने; आणि म्हणूनच प्रमाण ग्रांथिक भाषेला बोलींचें संजीवन सतत मिळत न गेल्यास ती केवळ ग्रंथांतच बंदिस्त होण्याची आणि अखेर इतिहासजमा होण्याची शक्यता असते. संस्कृत भाषेला कितीहि शास्त्रशुद्ध प्रतिष्ठा मिळालेली असली व कांही सुसंस्कृत वर्गाची आजहि ग्रंथलेखनाची भाषा म्हणून ती मधून मधून डोकावत असली तरी सर्वसामान्य लोकव्यवहाराच्या अभावीं ती इतिहासजमा झाली ती झाली. हीच गोष्ट तदनंतरच्या प्राकृत अपभ्रंश भाषांची. आज विद्यमान असणाऱ्या मराठी, गुजराती, बंगाली इत्यादि देशी भाषांचा जन्म झाला तो त्यानंतर. मराठी, गुजराती वगैरे प्रांतिक देशी भाषा आज आठशे-साडेआठशे वर्षे नांदतांना दिसत आहेत. ज्या प्रकारचें अवस्थांतर संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश या भाषांचें झालें तशा प्रकारचें अवस्थांतर होण्याचे प्रसंग त्यांच्यावर आले नाहीत, असें नाही. परंतु त्यांच्यांतूनहि त्या निभावून निघाल्या. येथे मुख्यतः मराठीचा विचार करावयाचा असल्यामुळे आपण तिचेंच उदाहरण घेऊं. जन्माला आल्यानंतर एक-दोन शतकांतच तिच्यावर ग्रांथिकता व व्याकरणमान्यता हे दोन्ही संस्कार घडले. त्यानंतर एक-दोन शतकांनी तिचें पार प्राकृतिक अवस्थांतर करूं शकेल असा

फार्शीउर्दूचा संबंध आला. पण त्यांतूनहि ती सहीसलामत बचावली. तिचें थोडेंफार अवस्थांतर झालें, पण तें नामांतर करण्याइतकें गंभीर ठरलें नाही; आणि याला कारण म्हणजे बोली स्वरूपांत तिचा सतत चालू राहिलेला व्यवहार. या बोली व्यवहारामुळेच गेल्या आठशे-साडेआठशे वर्षांत तिच्यावर आलेले प्राकृतिक बदल होण्याचे प्रसंग तिने परतविले. सारांश, बोलीच्या संजीवनीमुळेच ती आपल्या प्रौढ, प्रतिष्ठित आणि ग्रांथिक बनलेल्या स्वभावाबरोबर आपला मूळचा अल्लड, अवखळ, क्वचित् स्वैर पण जिवंत आणि नवनवोन्मेषी स्वभाव टिकवून राहिली आहे.

मराठीचें आज जें शिष्टमान्य ग्रांथिक रूप आढळतें, तें तिच्या अनेक प्रादेशिक बोलींपैकी कांही विशिष्ट बोलींचें परिणत आणि प्रमाण म्हणून मान्य झालेलें रूप आहे. ह्या तिच्या प्रमाण रूपांत इतर प्रादेशिक वा ज्ञातिविशिष्ट बोलींच्या छटा आढळणार नाहीत असें नाही. किंबहुना अशी कोणतीच ग्रांथिक भाषा नसेल की जिच्यांत तिच्या निरनिराळ्या बोलींच्या छटा आढळणार नाहीत. केवळ तिच्या बोलींच्याच काय पण अन्य भाषांच्या बोलींतील छटांनाहि तेथे मज्जाव नसतो. ह्या दृष्टीने आजच्या प्रमाण ग्रांथिक मराठींत तिच्या निरनिराळ्या बोलींच्या छटा आढळणें क्रमप्राप्तच आहे. मराठींत होऊन गेलेले मान्यवर ग्रंथकार नाना जातींचे, नाना पंथांचे आणि समाजांतल्या निरनिराळ्या सांस्कृतिक थरांतून जन्माला आलेले होते. त्यांनी त्यांना गुरुस्थानीं असणाऱ्या ग्रंथकारांच्या व पर्यायाने तत्कालीन प्रमाण मानल्या गेलेल्या ग्रांथिक भाषेचा आदर्श पुढे ठेवला असला व त्याबरहुकूम शक्य तों आपली ग्रंथरचना केलेली असली तरी त्यांच्या त्यांच्या बोलीच्या खास खुणा त्यांच्या लेखनांत न उतरल्या तरच नवल. लेखनरूप भाषेंत ही एक प्रकारची संजीवक भरच होती; आणि ती मराठी भाषा त्या काळींहि बोली स्वरूपांत जिवंत होती, म्हणूनच पडूं शकली! लेखनाची भाषा आणि बोली भाषा यांचा परस्पर संबंध या प्रकारचा असल्यामुळे, म्हणजे ग्रांथिक स्वरूपाच्या प्रमाण मराठीला तिच्या बोलींचा सतत जीवनाधार मिळत गेला असल्यामुळे, तिच्या केवळ ग्रांथिक स्वरूपाचाच विकास आपण पाहत गेलों तर तिच्या खऱ्याखुऱ्या व संपूर्ण विकासाचा आलेख आपल्याला काढतां येणार नाही. त्यासाठी त्या त्या काळच्या बोलींचाहि विचार करावा लागेल. पण हें शक्य आहे का? तत्कालीन बोलींचे नमुने आज जसेच्या तसे सापडणें तर अशक्य. मग त्यांचा शोध कसा घ्यावयाचा? मला वाटतें त्याला एकच मार्ग आहे, आणि तो म्हणजे तत्कालीन लिखित भाषेचाच ही लिखित भाषाच आपल्या व्यक्त ग्रांथिक स्वरूपाबरोबर तिच्यांत सामावलेल्या त्या त्या काळच्या बोलींच्या अस्पष्ट खुणा आपणाला दाखवूं शकेल. परंतु त्या अस्पष्ट खुणांचा मागोवा तरी कसा घ्यावयाचा?

मराठी भाषेचा इतिहास सांगूं शकणारें आणि आज उपलब्ध असणारें प्रमुख साधन म्हणून वेळोवेळीं मराठींत लिहिल्या गेलेल्या ग्रंथांकडे वळलें तरी मराठीच्या सम्यक् अभ्यासाला ते ग्रंथ आहेत त्या स्वरूपांत कितपत उपयोगी पडूं शकतील याविषयी शंकाच आहे. कारण, एक तर त्या साऱ्यांची पाठनिश्चिति आणि कालनिश्चिति अजून नीट झालेली नाही; आणि दुसरें असें की प्राचीन काळीं मराठींत ग्रंथरचना झाली ती मुख्यतः तत्त्वज्ञानपर ग्रंथांची व काव्यग्रंथांची. भक्ति, ज्ञान आणि वैराग्य ह्यांची शिकवण हें त्यांचें प्रमुख प्रयोजन. हें प्रयोजन साधूं पाहणारी भाषा कितीहि आबालसुबोध करण्याचा प्रयत्न केलेला असला तरी ती सुसंस्कृत झाल्याविना राहिली नसती. शिवाय त्या वेळचे बहुसंख्य लेखक स्वतः ज्ञानी, पंडित (व प्रतिभावंतहि) असल्यामुळे व ग्रंथलेखनाचे जे आदर्श त्यांच्यापुढे होते ते मुख्यतः संस्कृतांतील असल्यामुळे त्यांची भाषा प्रौढ पंडिती वळणाची न होती तरच नवल. मग अशा ग्रांथिक

भाषेंत त्या त्या काळचे बोली भाषेचे नमुने शोधावयाचे कसे? आणि त्याविना मराठी भाषेच्या सम्यक् विकासाचा आलेख काढावयाचा कसा?

ग्रंथकार जेव्हा आपला ग्रंथ लिहितो तेव्हा त्याने त्याच्या वेळच्या प्रमाण ग्रांथिक भाषेचाच अवलंब केलेला असला तरी कळत न कळत त्याच्या बोलीच्या खुणा त्याच्या ग्रंथांत उतरणें शक्य असतें. अशा ज्या कांही खुणा आढळतील त्यांच्या आधारें तत्कालीन बोलींचा माग थोडाफार लागूं शकेल. तसेंच लेखनरूप पावलेल्या कांही रूपांचें पूर्वरूप बनवितां ( reconstruct ) आलें तर त्यांचाहि या कामीं उपयोग होऊं शकेल. परंतु हें झालें मुख्यतः तत्त्वज्ञानपर ग्रंथांच्या वा काव्यग्रंथांच्या भाषेबद्दल. परंतु अशा ग्रंथांतील भाषेने तत्कालीन भाषेच्या जिवंत स्वरूपावर फारसा प्रकाश पडेल असें नाही. याचा अर्थ भाषाविकासाच्या अभ्यासांत त्यांचा अजिबात उपयोग नाही असें नाही; तसा थोडाफार आहे, पंरतु तो पुरेसा नाही. त्याला इतर प्रकारच्या ग्रंथांतील भाषाभ्यासाची जोड देणें अवश्य आहे.

तत्त्वज्ञानपर ग्रंथ किंवा काव्यग्रंथ ह्यांच्या मानाने प्रस्तुत संदर्भात अधिक उपयोगीं पडतील असे ग्रंथ म्हणजे गद्य ग्रंथ. गद्य ग्रंथहि तत्त्वज्ञानपर असूं शकतात, नव्हे तसे कांही आहेतहि. तरी पण त्यांचें लेखन गद्यांत झालेलें असल्याने कर्ता, कर्म, क्रियापद इत्यादिकांची योजना व एकंदर वाक्याची रचना इत्यादि भाषिक प्रक्रियेंत तत्कालीन रूढ भाषेहून ग्रंथकार फारसा दूर जाऊं शकणार नाही. शिवाय या मराठी गद्य ग्रंथांत कांही वर्णनपर ग्रंथ आहेत, कांही चरित्रपर ग्रंथ आहेत. त्यांचा, मराठीच्या तत्कालीन बोली स्वरूपाची कल्पना येण्यास, अधिक उपयोग होण्यासारखा आहे. माहिंभट्टाच्या 'लीळाचरित्रा' चा येथे विशेष उल्लेख करतां येईल. यांतील लीळा माहिंभट्टाने एकेक लीळेची भीक मागून जमविल्या आहेत. नागदेवाचार्यांनी नंतर त्यावर हात फिरविला आहे खरा; परंतु त्यांत चक्रधराच्या म्हणजे महात्मेयांच्या व इतर सर्वसामान्य परिवारूंच्या तोंडचे कितीतरी शब्दप्रयोग व वाक्प्रयोग आढळतात. ह्या प्रयोगांना तत्कालीन निदान एका विशिष्ट प्रदेशांतील मराठी बोलीचे खास नमुने मानण्यास हरकत नसावी. अर्थात्, बोलणारी व्यक्ति, तिचा सांस्कृतिक दर्जा आणि पुनः स्थळकाळादि विशिष्ट परिस्थिति इत्यादींचा तारतम्यपूर्वक विचार येथे अध्याहृत आहे.

काव्यापेक्षां व तत्त्वज्ञानपर पद्यलेखनापेक्षा गद्यलेखन-लेखन असलें तरी—बोलीच्या केव्हांहि अधिक जवळ असतें. ह्या दृष्टीने महानुभावांची गद्यरचनाच काय, पण तदोत्तरकालीं प्रसंगवशात् झालेली गद्यरचनाहि प्रस्तुत संदर्भात उपयुक्त ठरेल. मुसलमानांच्या राजवटींत व तदनंतरच्या छत्रपतींच्या वा पेशव्यांच्या राजवटींत जीं असंख्य पत्रें लिहिलीं गेलीं आहेत, त्यांत तत्कालीन निरनिराळ्या बोलींचे स्थलकालानुरूप अनेक नमुने सापडणें शक्य आहे. हीं पत्रें नाना पेशांच्या नाना लोकांनी निरनिराळ्या ठिकाणांहून लिहिलेलीं आहेत. पत्रलेखनाचे, लेखकांच्या हुद्दयादर्जानुरूप, कांही संकेत ठरलेले असले तरी लेखनाच्या ओघांत स्थानिक वा वैयक्तिक बोलीच्या लकबा उतरणें अशक्य नाही; किंबहुना ह्या पत्रांतील भाषा तत्कालीन बोलींच्या अधिक जवळ नेऊं शकेल. भाषाविकासाच्या अभ्यासाला, म्हणूनच, त्यांचा अधिक उपयोग होण्यासारखा आहे.

मराठी भाषेच्या ऐतिहासिक विकासाभ्यासांत ग्रांथिक रूपाबरोबर ग्रांथिक रूपांत दडलेल्या बोलींचा याप्रमाणे मागोवा घेतां येत असला तरी या सर्व उद्योगांत कांही महत्त्वाचीं पथ्यें पाळणें अवश्य आहे. भाषेचा विकास अनेक अंगांनी अनेक प्रकारें होत असतो. शिवाय तिचें स्वरूप इतकें अनेकविध असतें की त्या सर्यांचा विचार एकाच सरधोपट पद्धतीने केला तर तिचें सम्यक् दर्शन होऊंच शकणार नाही. कालांतराने मराठी भाषेंत फरक पडत गेला, तसाच

स्थलांतरानेहि तिच्यांत फरक पडलेला आहे हें विसरून चालणार नाही. उदा. सोळाव्या शतकांतील देशावरील मराठीच्या एखाद्या रूपाची परिणति सतराव्या शतकांतील कोंकणी वा वऱ्हाडी मराठीच्या रूपाने सिद्ध करतां येईलच असें नाही; नव्हे, ती तशी करूनहि चालणार नाही. त्यासाठी देशावरील प्रादेशिक रूपांची परिणति देशावरील त्याच प्रदेशांतील तदनंतरच्या रूपाने सिद्ध झाली पाहिजे. हीच गोष्ट इतर प्रादेशिक रूपांची. म्हणजे मराठीचा केवळ ऐतिहासिक कालानुक्रमाने विकास पाहून चालणार नाही, तर त्या जोडीला त्या त्या रूपांची प्रादेशिकताहि लक्षांत घ्यावी लागेल. स्थळ आणि काळ यांचा परस्परसंदर्भ येथें फार महत्त्वाचा आहे.

मराठीच्या ऐतिहासिक व्याकरणाला या विशिष्ट स्थळ-काळ-संबंधाच्या दृष्टिकोनाची अतिशय आवश्यकता आहे. त्याविना केवळ यादवकालीन, शिवकालीन, पेशवेकालीन अशी भाषिक पाहणी अपूर्ण ठरल्यास आश्चर्य नाही. मराठीच्या ऐतिहासिक व्याकरणाची पूर्वतयारी म्हणून असे कालिक भाषाभ्यास उपयुक्त असले तरी प्रादेशिक भाषाभ्यासाची जोड त्यांना देणें आवश्यक आहे. प्रादेशिक भाषेच्या अभ्यासाबरोबर त्या त्या प्रदेशांतील निरनिराळ्या जाती-जमातींच्या भाषांचे कांही विशेष नमूद झाले आहेत का हेंहि पाहणें अगत्याचें आहे. उदा. १३ व्या व १४ व्या शतकांतील ज्ञानेश्वरांच्या प्रभावळींतील संतकवींच्या कवितेंत त्यांच्या त्यांच्या बोलींतहि कांहीं खास लकबा शिरल्या असणें शक्य आहे. तसेंच, एकाच ग्रंथाच्या ज्या निरनिराळ्या नकला असतात त्यांत पाठनिश्चितीच्या दृष्टीने अक्षम्य असे जे अपपाठ अढळतात, किंवा जे भिन्न भिन्न पाठ आढळतात त्या भिन्न पाठांतहि तत्कालीन नकलकारांच्या बोलींचे कांही अवशेष उतरणें अशक्य नाही. तुकोबांच्या अभंगांची संताजी जगनाडे याने उतरलेली गाथा आणि गंगाधर मवाळ याने लिहिलेली गाथा ह्यांत जो भाषिक फरक आढळतो, तो तत्कालीन तेलीजमातीची भाषा आणि ब्राह्मणवर्गाची भाषा ( संताजी जगनाडे व गंगाधर मवाळ हे अनुक्रमें तेली व ब्राह्मण असून, तुकारामाच्या १४ टाळकऱ्यांपैकी होते. ) यांची द्योतक असण्याची शक्यता आहे.

ग्रांथिक भाषेंत लपलेले बोली भाषेचे अवशेष शोधण्याचे असे किती तरी प्रकार सांगतां येतील. त्या साऱ्यांची वर्गवारी करण्याचा प्रस्तुत उद्देश नाही. मुख्य मुद्दा एवढाच की, अशा प्रकारचीं बोलीभाषांचीं जीं रूपें ग्रांथिक भाषेंत या ना त्या कारणाने सामावलीं गेलीं असतील त्यांचा शोध घेतला तर ग्रांथिक भाषेच्या विकासाच्या अभ्यासाबरोबर बोली भाषेच्या विकासाच्या अभ्यासाची जी आवश्यकता आहे ती अंशतः तरी पूर्ण होणें शक्य आहे. ● ● ●

# साहित्य-समीक्षा

## संत, पंत व तंत

कै. माटे ह्यांचा प्राचीन मराठी वाङ्मयविषयक स्फुट लेखांचा हा संग्रह. प्रस्तुत ग्रंथांत एकूण पंचवीस लेख समाविष्ट केले असून त्यांपैकी बावीस लेख संतकविविषयक, एक पंडित-कविविषयक, एक प्राचीन मराठी वाङ्मयाची भूमिका सिद्ध करणारा व एक मराठीचे पाणिनि दादोबा ह्यांच्यासंबंधी असे आहेत. अर्थातच ग्रंथाच्या नांवावरून त्याच्या अंतरंगांचा स्पष्ट बोध होत नाही हें उघड आहे.

माट्यांचें लेखन हें त्यांच्या वक्तृत्वाप्रमाणेच त्यांच्या चिंतनशील वृत्तींतून नेहमीं निर्माण होतें. म्हणूनच त्यांची वैचारिक बैठक भक्कम असते. त्यांच्या विवेचनांत एका मूळ कल्पना-सूत्रांतून विचारांचे धागे क्रमाक्रमाने निर्माण होऊन शेवटीं सिद्धान्तरूप मुख्य विषयाचें महावस्त्र निर्माण झालेलें दिसतें. 'तत्त्ववेत्त्याचा अभिनिवेश, सामान्य सिद्धान्त प्रतिपादणाराचा हट्ट, किंवा स्वतःलाच न उलगडलेल्या विचारांचें गुल्म त्यांच्या लिखाणांत कोठेहि आढळत नसत' हें तात्यासाहेब केळकरांचें वर्णन त्यांनीच एके ठिकाणीं जें केलेलें आहे तें त्यांनाहि यथार्थपणें लागू पडतें. कोणत्याहि प्रश्नाच्या साधकबाधक बाजू पाहणें आणि तारतम्याने समधात बनून त्या वाचकांपुढे मांडणें हा केळकरांचा गुण माट्यांच्यांतहि दिसतो. माट्यांचें लेखन वाचतांना केळकरांच्या लेखनाची आठवण जी होते ती याच कारणामुळे.

माटे ह्यांच्या प्रस्तुत लेखांचें वैशिष्ट्य म्हणजे त्यांचें रसिकतापूर्ण स्वतंत्र विवेचन हें होय. 'पांडुरंगाचें स्थलांतर आणि पुंडलिकाचें रूपांतर' ह्या पहिल्याच नावीन्यपूर्ण लेखांत पांडुरंगाच्या मूर्तीचें पूर्वी केव्हातरी स्थलांतर झालें असावें; तद्वतच पूर्वी केव्हातरी पुंडलिकाची मूर्ति अस्तित्वांत असली पाहिजे असें ते म्हणतात; व आपल्या मताला ते संतवाङ्मयांतील उपोद्बलक असे आधारहि देतात. लेखकाचें हें मत इतिहासदृष्ट्या कितपत मान्य होईल हा एक विचाराचा प्रश्न आहे.

साडेसहाशे वर्षांपूर्वी संतमंडळाने केलेल्या क्रांतीची मूळ बैठक सामाजिक होती हें सांगतांना संतक्रांतीपासून लोकशाहीच्या तत्त्वाला आरंभ झालेला आहे असें ते प्रतिपादन करतात. इतकेंच नव्हे तर, संतवाङ्मयांतील वेदान्त, अध्यात्म, भक्ति आणि भाषिक अंग ह्यालाच महत्त्व देण्यांत येतें हा संतांवर झालेला अन्यायच होय असेंहि ते म्हणतात. 'ज्ञानेश्वर एक की दोन' ह्या जुन्या ऐतिहासिक वादाची चर्चा निळोबापासून नामदेव ह्या क्रमाने तपशीलवार संतवचनांच्या आधारें केलेली आढळते. भागवतकारांनी कृष्णाचें चित्रण केलें असलें तरी महाराष्ट्रांतील भक्तिमार्गाला तत्त्वज्ञानाचें अधिष्ठान प्राप्त करून देणाऱ्या ज्ञानेश्वराने

---

**संत, पंत व तंत** —[ लेखक : श्री. म. माटे; प्रकाशक : ग. ल. ठोकळ, बी. ए., बी. टी. ठोकळ प्रकाशन, ६२ बुधवार, पुणें २. पृष्ठें ३१०, किंमत ५ रुपये. ]

मात्र श्रीकृष्णाचें चित्रण तात्त्विक स्वरूपाचें केलें ही ज्ञानेश्वरांची भागवतावर टीकाच आहे हें लेखकाचें मत पटावें. भागवतकार व ज्ञानदेवीकार ह्यांच्या भूमिकांचें ग्रंथकाराने केलेलें विश्लेषण त्याच्या चिकित्सक दृष्टीची साक्ष देतें.

जुन्या मराठी वाङ्मयांत गुरुभक्तीचें महत्त्व विशेष आहे. कोणताहि जुना मराठी कवि घेतला तरी त्याची विचारसंपदा ही एका विशिष्ट गुरुपरंपरेंतून आलेली असते. आध्यात्मिक क्षेत्रांत गुरु ही एक महत्त्वाची संस्था मानली जाई. लेखकाने ज्ञानेश्वरापासून रामदास-पर्यंत सर्व संतकवींची ह्या बाबतींत साक्ष काढली असून, ह्या संस्थेची महती सप्रमाण पटवून दिली आहे. जुन्या मराठी वाङ्मयांत महार संतांचा एक विशिष्ट वर्ग होता. आजच्याप्रमाणेच त्यांच्या मनाचें एक सामाजिक दुखणें होतें. समाजाविरुद्ध त्यांनी केलेली तक्रार त्यांच्या वाङ्मयांत स्पष्टपणें व्यक्त झालेली आहे. चोखोबासारख्या महार संताने आपल्या पारमार्थिक अधिकाराच्या बळावर संतमंडळींत मोठें मानाचें स्थान प्राप्त करून घेतलें होतें. लेखकाचा दावा असा की, ह्या मंडळींचें दुखणें केवळ पारमार्थिक नसून स्पष्टपणें सामाजिकहि होतें. ह्या संतांच्या व आजच्या अस्पृष्टांच्या भावना त्याच आहेत. त्यांचें सामाजिक दुःख व सामाजिक त्वेष तोच आहे. लेखक स्वतः अस्पृश्यतेच्या चळवळीचा प्रमुख कार्यकर्ता असल्यामुळे त्याची पोटतिडीक साहजिकच हृदयाला भिडणारी आहे.

नामयाची दासी जनी हिच्या पारमार्थिक जीवनाचा एका लेखांत आढावा घेतलेला आढळतो. लेखक म्हणतो की दासी जनीचें नांव संतमंडळांत अढळ झालें आहे तें तिच्या जीवनांतील चमत्कारांमुळे नव्हे, तर भक्तीचें मर्म तिला खरेंखरें कळलें आहे म्हणून. प्रस्तुत लेखांत तिच्या अभंगांच्या आधारें तिचें यथार्थ दर्शन घडविलें आहे. ‘भक्तिमार्गाचा नवा पुरस्कर्ता एकनाथ’ ह्या लेखांत भारूड ह्या वाङ्मयप्रकाराचा इतिहास दिलेला आहे. लेखकाची विचारसरणी अशी की, भारूड कवनाची पद्धति विठ्ठलसंप्रदायांत ज्ञानेश्वरनामदेवापासून झाली होती. भारुडाची रचना ही मनःस्वास्थ्याची निशाणी असल्यामुळे अल्पायुषी ज्ञानेश्वर हे त्यांत बहुधा कधी गुंतले नसावेत. ज्ञानेश्वराच्या नांवावर जी भारुडें आहेत तीं त्यांनी रचलीं नसावींत. एकनाथाचें कार्य म्हणजे त्याने विषयवैराग्य आणि प्रपंचापासून अलिप्तता भारुडांच्या द्वारा लोकांना शिकविलीं. एकनाथी भारुडांचें वैशिष्ट्य हेंच की, त्यांत निर्गुण निरामय ब्रह्माचा वारंवार उल्लेख येतो. इतर संतांच्या भारुडांत देहधारी परमेश्वराचे उल्लेख येतात. एकनाथाचें हें आगळेपण लक्षांत घेतलें पाहिजे.

‘प्रचाराची अतिव्याप्ति’ ह्या निबंधांत संतमंडळींनी इतर पंथांवर चढविलेले हल्ले जेवढे बौद्धिक सचोटीचे असावयास हवे होते तेवढे नाहीत हा मुद्दा मांडलेला आहे. भक्तिमार्ग हा एकच खरा मार्ग आहे, बाकीचे मार्ग चुकीचे आहेत हें दाखविण्यासाठी संतांनी हल्ले चढविले असले पाहिजेत असें लेखकास वाटतें. संतांनी केलेला अनार्य देवतांचा धिक्कार हा परमेश्वरविषयक कल्पना शुद्ध होत जाण्याला निःसंशय उपयोगी आहे हा विचार मान्य होण्यास प्रत्यवाय नाही. संतांच्या वाङ्मयांत बायकापोरांचा धिक्कार केलेला आढळतो हें शल्य लेखकाच्या मनाला बोचतें. संतांच्या एतद्विषयक उद्गारावरून स्त्रीची योग्यता संतांना पटली नव्हती असें लेखक निर्भीडपणें म्हणतो. संतांचा मोठेपणा मान्य करूनहि लेखकाने उपस्थित केलेला हा मुद्दा चिन्त्य वाटतो.

तुकाराम महाराजांची ‘सुळावरची पोळी’ ह्या लेखांत तुकारामाच्या पारमार्थिक जीवनाचें विश्लेषण केलेलें आहे. तुकारामाचें तप किती खडतर होतें हें त्याच्या वचनाधारें लेखकाने दाखवून दिलें आहे. संतवाङ्मयांतील एक महत्त्वाचा दोष म्हणजे त्यांत लेखनकाल-

निर्देशाचा अभाव हा होय. ह्या दोषामुळें संतांच्या पारमार्थिक प्रवासाची स्पष्ट कल्पना येत नाही. संतवाङ्मयाच्या अभ्यासांत ही एक मोठीच अडचण आहे अशी लेखक तक्रार करतो. संतांनी प्रवृत्तिवाद शिकविला की निवृत्तिवाद शिकविला ह्याचें मार्मिक विवेचन 'संतांची निवृत्तिपरता' ह्या लेखांत आढळतें. ज्ञानेश्वरतुकारामादि संत काय किंवा रामदास काय ह्या सर्वांच्या मनाचें मूळचें उत्थान परमार्थाचेंच होतें हें लेखकानें सोदाहरण सिद्ध केलें आहे. संतांची भूमिका त्यांच्या वाङ्मयावरून स्पष्ट दिसते. लेखकाच्या मतें ह्याला वादाची मुळींच गरज नाही.

वारकरी मंडळी रामदासांना कां मानीत नाहींत ह्या पंढरपूरचे संशोधक श्री. बाबूराव बाहिरट ह्यांच्या रामदासाविरुद्ध घेतलेल्या आक्षेपाला लेखकानें एका लेखांत समर्पक उत्तर दिलें आहे. वस्तुतः श्रीरामदासस्वामींना समकालीन लोक संतच समजत होते. ते त्यांना ज्ञानेश्वरादि संतांच्या मालिकेंत बसवीत होते व एक लोकोत्तर पुरुष मानीत होते. रामदास हे इतर संतां-प्रमाणे भक्तिमार्गी संत होतेच होते अशी लेखकाची विचारसरणी आहे. रामदासस्वामींचें मनुष्यस्वभावाचें ज्ञान किती अचूक होतें हें लेखकानें एके ठिकाणीं पटवून दिलें आहे. मानवी मनोधर्माची ओळख व त्या मनोधर्मांचा ललित पद्धतीनें आविष्कार हे रामदासांचे विशेष होत. ह्या दृष्टीनें पाहतां स्वामींच्या लिखाणाला वाङ्मयाच्या दरबारांतसुद्धा श्रेष्ठ पदवी द्यावी लागेल हें ग्रंथकर्त्याचें मत सयुक्तिकच वाटतें

रामदासानें प्रापंचिकांना संसाराची सनद दिली हें रामदासाचें राजकारण होय असें माटे म्हणतात. परंतु दुर्दैव असें की, त्याचें सर्व प्रपंचविज्ञान त्याच्या ग्रंथांतच स्थगित झालें. कारण पारमार्थिकांनी रामदासाला दगा दिला असेंहि ते सांगतात. रामदासांचा दिव्य संदेश मागे पडण्याची कारणमीमांसा लेखकानें इतकी मुद्देसूद केली आहे की, ती समर्थभक्तांनाहि मान्य व्हावी. समर्थांचें 'आनंदवनभुवन' म्हणजे वाराणसी हें समर्थभक्त श्रीशंकरराव देव ह्यांचें मत सर्वस्वीं बरोबर नाही हें सदर काव्याची चिकित्सा करून ग्रंथकारानें म्हटलें आहे. त्याचा निष्कर्ष असा की, हें काव्य वाराणसीला सर्वस्वीं लागू पडत नाही आणि महाराष्ट्रालाहि सर्वस्वीं लागू पडत नाही. 'रामवरदायिनी माता' ह्या स्तोत्राधारें सदर प्रार्थना समर्थांनी शिवाजीच्या लहानपणीं केली व पुढे तीस-बत्तीस वर्षांनीहि केली म्हणजे शिवाजीच्या हयातभर रामदासाचें लक्ष्य त्याच्याकडे होतें असें दाखवून दिलें आहे. ज्ञानेश्वरापासून केशवसुतांपर्यंत निरनिराळ्या कालखंडांत कविमनाला स्वतंत्रपण लाभलेलें होतें हें मत 'मराठी काव्याचें बंधविमोचन' ह्या लेखांत प्रतिपादन केलें आहे. ह्या लेखांत मराठी काव्याचा पद्धतशीर आढावा घेतलेला दिसतो. पंडित कवींच्या कवितेंत दुर्बोधता कां आहे त्याची चर्चा एका लेखांत आहे. त्यांची समाजशिक्षणाची भूमिका सुटली म्हणूनच त्यांत दुर्बोधत्व आलें हा मुद्दा त्या लेखांत ठसठशीतपणें मांडलेला आढळतो. व्याकरणकार दादोबांना पूर्वज कां नाही ह्या प्रश्नाची चर्चा करतांना मराठी भाषेला बोधभाषेचें महत्त्व मिळाल्यामुळे मराठींत व्याकरण झालें नाही हा लेखकाचा मुद्दा महत्त्वाचा मानला पाहिजे.

कै. माट्यांचें हें शेवटचें पुस्तक. शिवाय ह्या पुस्तकाला ते निवेदन देऊं शकले नाहींत, ह्यामुळें तर विशेष हळहळ वाटते. एका बाजूनें कर्त्याचें मरण व दुसऱ्या बाजूनें अपत्याचें जनन ही घटना मनाला चटका लावते. मराठी साहित्याला माट्यांनी दिलेली ही शेवटची मौलिक देणगी त्यांचें नांव साहित्यक्षेत्रांत चिरस्थायी करील हें निश्चित. ● ● ●

र. वि. हेरवाडकर

## त्रिविक्रमा टीकेसह मेघदूत

मेघदूताच्या आजवर अस्तित्वांत असलेल्या अनुवादांत आणखी एका उपयुक्त अनुवादाची भर या ग्रंथाने पडत आहे. परंतु इतर अनुवादांपेक्षा या अनुवादाचें एक निराळें वैशिष्ट्य आहे. ग्रंथकर्त्यांच्याच शब्दांत सांगावयाचें म्हटलें तर '(१) कालिदास-काल, (२) मनोरंजक भाष्य व (३) समश्लोक अनुवाद या तीन विक्रमांनी युक्त अशी' ही त्यांची मेघदूतत्रिविक्रमा आहे. यांपैकी मेघदूताचा यशस्वी अनुवाद व कालिदासकालनिर्णय हीं दोन साधल्यास खरोखरीच 'विक्रम' म्हणावयास हवेत याविषयीं दुमत व्हायचें नाहीं. मनोरंजक भाष्यांत श्री. केतकर यांनी बरीच उपयुक्त व नवीन अशी माहिती दिली आहे. या भाष्यांत त्यांचा व्यासंग व रसिकता या दोन्ही गोष्टी उठून दिसतात. केवळ निर्देश करावयाचा झाला तर श्लोक २१ मधील 'सारंग' व श्लोक १५ मधील 'वल्मीक' या शब्दांवरील भाष्यें पाहावींत असें म्हणतां येईल. या भाष्याने मुळाचें रसग्रहण करण्यास निश्चित मदत होते.

समश्लोकी अनुवाद हा बराचसा संस्कृतप्रचुर आहे. दोनच उदाहरणें देतों :–

अंग-स्पर्शे हरत सुरत-ग्लानि तेथें स्त्रियांची ।
क्षिप्रा-वात प्रिय-तम जणूं प्रार्थना-चाटु-वाची ॥३२॥

मुळांतील 'प्रार्थनाचाटुकारः' हें पद अनुवादांत 'प्रार्थना–चाटु–वाची' या रूपांत आलें आहे. याने अर्थावर किती प्रकाश पडतो ! तेंच 'तस्योत्सङ्गे' श्लोक ६७ च्या भाषान्तरासंबंधी म्हणतां येईल. अनुवाद संस्कृतप्रचुर असावा कीं नसावा याविषयी मतभेद होण्याचा संभव असल्यामुळे त्यासंबंधी अधिक कांही म्हणणें इष्ट नाही. कांही ठिकाणीं प्रसाद आढळेल. पाहा. पृ. ४० श्लोक ४३. अर्थविपर्यास कोठेहि नाही. अर्थान्तरन्यासाचीं भाषान्तरें तितकींच भारदस्त आहेत. मेघदूताचा सुगम मराठी अनुवाद हा खरोखरीच एक 'विक्रम' असून तो अजून केला जावयाचा आहे असें रसिकांस वाटलें तर तो त्यांचा दोष नाही.

कालिदासाच्या कालनिर्णयासंबंधीहि असेंच म्हणावें लागेल. श्री. केतकर यांनी रघुवंश सर्ग १६ श्लोक ४३–४५ या आधारें हें सारें विवेचन केलें आहे. त्यांच्या विवेचनानंतर या श्लोकांच्या अर्थाविषयी कोणाच्याहि मनांत संदेह राहूं नये इतकें तें निर्णायक स्वरूपाचें आहे असें म्हणण्यास हरकत नाही. तथापि एवढ्यावरून कालिदासाचा काळ निश्चित झाला असें म्हणणें मात्र अतिशयोक्त वाटतें. इ. स. २८०, २१ जूनला घडलेली घटना चौथ्या अथवा पांचव्या शतकांतील कवि करणें संभवनीय कां नाही तें समजूं शकत नाहीं. कालिदासाच्या कालनिर्णयाला एवढें एकच तत्त्व लावून चालणार नाही त्याची भाषा, त्याच्या ग्रन्थांतून प्रतिबिम्बित झालेली सामाजिक व ऐतिहासिक परिस्थिति, इतर साहित्याशीं दिसून येणारें त्याच्या साहित्याचें संबंध हें सारें ध्यानांत घ्यावयास हवें. 'मालविकाग्निमित्र' याचा ३१२ हा अर्थ चिन्त्यच आहे. संस्कृत वाङ्मय व कवि यांच्या कालनिर्णयांत ज्योतिषविषयक उल्लेखांना किती महत्त्व द्यावयाचें यासंबंधी वादंगच अजून राहिलेलें आहे. वेदकालनिर्णयासंबंधीच्या विद्वानांच्या मतभेदाकडे लक्ष वेधलें म्हणजे झालें. श्री. केतकर यांच्या विवेचनावरून आज इतकेंच म्हणतां येईल की, कालिदासाचा काल हा २८० इ. स. व ऐदीले येथील शिलालेख यांच्यामध्ये पडतो. यापेक्षा अधिक कालसंकोच करण्यास पुढच्या प्रत्येक पायरीस अधिक पुरावा हवा असेंच कोणीहि म्हणेल. खुद्द श्री. केतकरांची दृष्टि शास्त्रीय असून सबळ पुराव्याच्या

[ त्रिविक्रमा टीकेसह मेघदूत–लेखक : द. वें. केतकर, सेवानिवृत्त. बी.ए.,बी.टी., विजापूर.]

अभावीं कांही मान्य करणें त्यांना पटत नसल्याने हा आग्रह त्यांना पटेल असें वाटतें. असल्या आग्रहांनी संशोधनाची प्रगति मंदावते हें जरी खरें तरी त्यामुळे त्याचें बळ व शुद्धि वाढतात हेंहि तितकेंच खरें. वाल्मीकि व कालिदास यांच्यासंबंधीचें विवेचन मूलग्राही असें आहे. अश्वघोष–भास–कालिदास यांच्या परस्परऋणाविषयीचे त्यांचे निष्कर्ष सर्वसामान्यपणें मान्य होण्यासारखे असले तरी भासविषयक मताविषयी मतभेद होण्याची शक्यता जरूर आहे. श्री. केतकर यांनी कालिदासविषयक वाङ्मयांत मोलाची भर घातली आहे यांत शंका नाही. त्याबद्दल त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन. ● ● ●

म. गो. माईणकर

---

## मराठी साहित्य संमेलन, ४० वें अधिवेशन–मालवण ( १९५८ ).

# संमत झालेले ठराव

### १. दुखवटा

गतवर्षीं निधन पावलेल्या पुढील व्यक्तींबाबत हें संमेलन दुखवटा व्यक्त करीत आहेः– श्री. रा. द. रानडे, श्री. दि. वा. दिवेकर, श्री. गं. गो. कानेटकर, श्री. के. भि. ढवळे, श्री. न. शं. रहाळकर, प्रा. ना. के. बेहेरे, श्री. के. वि. फणसे, श्री. ग. श्री. हुपरीकर, श्री. श्री. ना. काकतकर, श्री. केशव गोरे, श्री. शं. श्री. देव व श्री. नाना जोग.

### २. कै. श्री. म. माटे

प्रा. श्री. म. ऊर्फ बापूसाहेब माटे यांचे दुःखद निधन बुधवार दि. २५-१२-५७ रोजीं झालें. कै. बापूसाहेबांनी महाराष्ट्र आणि मराठी भाषा यांची अखेरपर्यंत सेवा केली. समाजशास्त्र, विज्ञान आणि ललितवाङ्मय या तीनहि दालनांत बहुमोल विचारसंपदा ग्रंथरूपाने त्यांनी निर्माण केलेली आहे. १९४३ सालीं सांगली येथील साहित्य-संमेलनाचें अध्यक्षपद त्यांनी भूषविलें. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्याशीं तर त्यांची स्मृति कायमची निगडित झाली आहे. अनेक वर्षे कार्याध्यक्षपद भूषवून त्यांनी म. सा. परिषदेंत अपूर्व कामगिरी केली. चिपळूणकर सभागृह हें त्यांच्या कर्तृत्वाचें प्रतीक आहे. कै. आपटे संदर्भ-संग्रहालय व वाङ्मयेतिहास योजना या कार्यांतहि त्यांचा पुढाकार होता. तळमळीचे सामाजिक कार्यकर्ते, आदरणीय प्राध्यापक, प्रभावी वक्ते आणि महाराष्ट्रीय जीवनाची थोर परंपरा वृद्धिंगत करणारे बापूसाहेब यांच्या निधनाने मराठी साहित्य आणि म. सा. परिषद् यांची अपरिमित हानी झालेली आहे. हें संमेलन कृतज्ञतेने कै. बापूसाहेबांना श्रद्धांजलि अर्पण करीत आहे व त्यांच्या आत्म्यास सद्गति लाभो अशी प्रार्थना करीत आहे. कै. बापूसाहेबांच्या निधनाने त्यांच्या कुटुंबियावर ओढवलेल्या दुःखांत हें संमेलन सहभागी होत आहे.

### ३. महर्षि कर्वे-अभीष्टचिंतन

महाराष्ट्राचे एक थोर सुपुत्र आणि श्रेष्ठ दर्जाचे सामाजिक व शैक्षणिक कार्यकर्ते महर्षि धोंडो केशव ऊर्फ अण्णासाहेब कर्वे यांना १८ एप्रिल १९५८ रोजीं १०० वर्षे पूर्ण झाल्याबद्दल या साहित्य-संमेलनास अत्यंत आनंद होत आहे. महर्षींचे जीवन म्हणजे महाराष्ट्राच्या गेल्या शंभर वर्षांच्या सामाजिक व स्त्री-शिक्षणाच्या कार्याचा जिवंत इतिहास आहे. अशा या थोर कार्यकर्त्यास " भारतरत्न " हा परमोच्च बहुमान सरकारकडून मिळाला याबद्दलहि या संमेलनाला संतोष वाटत आहे. महर्षींना आणखी दीर्घ व निरामय आयुष्य लाभून त्यांच्या हातून महाराष्ट्राची व मानवतेची सेवा घडो अशी सदिच्छा हें संमेलन व्यक्त करीत आहे.

## ४. स्वातंत्र्यवीर सावरकर–अभीष्टचिंतन

महाराष्ट्रांतील प्रतिभासंपन्न लेखक व कवि आणि मुंबई येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष श्री. विनायक दामोदर सावरकर यांना २८ मे १९५८ रोजीं पंचाहत्तर वर्षे पूर्ण होत आहेत. त्यांच्या या अमृतोत्सवानिमित्त हें संमेलन त्यांचें अभीष्टचिंतन करीत आहे.

## ५. श्री. वरेरकर–अभीष्टचिंतन

मराठींतील सुप्रसिद्ध नाटककार व धुळे येथे भरलेल्या महाराष्ट्र-साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. भा. वि. ऊर्फ मामासाहेब वरेरकर यांना नुकतींच पंचाहत्तर वर्षे पूर्ण झालीं, याबद्दल हें संमेलन त्यांचें अभीष्टचिंतन करीत आहे.

## ६. श्री. खांडेकर–अभीष्टचिंतन

मराठींतील सुप्रसिद्ध कादंबरीकार व टीकाकार आणि सोलापूर येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. वि. स. ऊर्फ भाऊसाहेब खांडेकर यांना नुकतींच साठ वर्षे पूर्ण झालीं. त्यांच्या या षष्ठ्यब्दिपूर्तीनिमित्त हें संमेलन त्यांचें अभीष्टचिंतन करीत आहे.

## ७. कै. केशवसुत–स्मारक

मराठींतील एक थोर युगप्रवर्तक कवि केशवसुत यांचें स्मारक करण्यासाठीं समिति स्थापन झाली असून ही समिति केशवसुतांचे जन्मगांव मालगुंड येथे त्यांचें एक शैक्षणिक स्मारक करणार आहे. स्मारकाच्या या कार्याला सर्वांनीं साहाय्य करावें अशी या संमेलनाची सर्व मराठी भाषिकांना विनंती आहे.

## ८. औरंगाबाद नभोवाणी

मराठी साहित्य संमेलनाचें हें अधिवेशन भारतीय आकाशवाणीच्या मुंबई केंद्रावरून होणाऱ्या मराठी कार्यक्रमाच्या प्रक्षेपणासाठी कमी वेळ दिला जात असल्याबद्दल खेद व्यक्त करितें व मराठवाडा आणि लगतच्या प्रदेशासाठी पूर्वी असलेले औरंगाबाद नभोवाणी केंद्र पुन्हा त्वरित सुरू करण्याची सरकारला आग्रहपूर्वक विनती करीत आहे.

## ९. ग्रंथालय–चळवळी

मराठी साहित्याच्या दृष्टीनें ग्रंथांच्या व ग्रंथालयांच्या अभिवृध्यर्थ महाराष्ट्र ग्रंथालय संघ व परिषदा यांनी जे विविध स्तुत्य प्रयत्न चालविले आहेत त्यांस हें संमेलन हार्दिक व जोरदार पाठिंबा देत आहे.

## १०. मालवणी -बोली

भारतीय आकाशवाणीवर मराठी कार्यक्रमाबरोबर तिच्या कोंकणी बोलीचे कार्यक्रम होत असतात. या कोंकणी कार्यक्रमापैकी कांही वेळ मालवणी ( कुडाळी ) या लोकबोलीसाठी राखून ठेवावा अशी या संमेलनाची आकाशवाणीला विनंती आहे.

## ११. शिरगणती

१९५० च्या शिरगणतींत कोंकणीचा स्वतंत्र भाषा म्हणून उल्लेख केल्यामुळे त्याचे परिणाम मराठी भाषिकांच्या दृष्टीने विघातक ठरले. कोंकणी ही मराठीचीच बोली असल्यामुळे यापुढे शिरगणतीचे प्रसंगीं तिचा स्वतंत्र उल्लेख न करतां मराठी भाषिकांतच कोंकणी बोलणाऱ्यांचा अंतर्भाव करावा अशी या संमेलनाची सरकारला मागणी आहे.

## १२. कोंकण-रेल्वे

कोंकण हा महाराष्ट्राचा नैसर्गिक साधनांनी समृद्ध असलेला एक भाग आहे. या भागाचा सर्वांगीण विकास होण्याच्या दृष्टीने आज असलेलीं वाहतुकीचीं साधनें अत्यंत अपुरीं

आहेत. त्यामुळे कोंकणनिवासी जनतेची आर्थिक, शैक्षणिक व सांस्कृतिक वाढहि खुंटलेली आहे. ही परिस्थिति शक्य तितक्या लवकर दूर व्हावी म्हणून हें संमेलन कोंकण रेल्वेची व त्याजबरोबर रस्ते व इतर सर्व वाहतुकीच्या सुधारणांची निकडीने मागणी करीत आहे.

## १३. साहित्य- संस्था-संघीकरण

महाराष्ट्रांतील साहित्यसंस्थांच्या संघीकरणासंबंधी औरंगाबाद येथे मराठी साहित्य संमेलनाच्या गेल्या अधिवेशनांत देण्यांत आलेल्या आदेशानुसार, त्या संमेलनाने नेमलेल्या प्रातिनिधिक समितीने संघीकरणाच्या स्वरूपासंबंधी एक स्थूल योजना ऐकमत्याने तयार करून, ती महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळाला सादर केली याबद्दल हें संमेलन सदरहू समितीचें अभिनंदन करतें. महाराष्ट्र–साहित्य–परिषदेच्या कार्यकारी मंडळाने लोकमत अजमावण्यासाठी ही योजना प्रसिद्ध केली. तसेंच या योजनेला अनुसरून महाराष्ट्र–साहित्य–परिषदेच्या कार्यकारी मंडळाने नवीन मराठी साहित्य परिषदेच्या घटनेचा स्थूल खर्डा तयार करून तो मान्यतेसाठी घटकसंस्थांकडे पाठविला. महाराष्ट्र साहित्य परिषद, विदर्भ साहित्य संघ, मराठवाडा साहित्य परिषद् व मुंबई मराठी साहित्य संघ या घटकसंस्थांनी आता संघीकरणाचा हा हेतु पुढील संमेलनाचे आंत तडीस न्यावा अशी या संमेलनाची त्यांना विनंती आहे.

## १४. आगामी संमेलन

मराठी साहित्य संमेलनाच्या आगामी ४१ व्या अधिवेशनाचें रीतसर निमंत्रण स्नेहसंवर्धक संघ, मिरज, या संस्थेकडून आलें आहे. त्या निमंत्रणाचा हें संमेलन सहर्ष स्वीकार करीत आहे.

## १५. संयुक्त महाराष्ट्र

भाषा व संस्कृति यांच्या समृद्धीसाठी व लोकशाहीच्या तत्त्वानुसार भाषावार प्रांत-रचनेचा पुरस्कार व मागणी मराठी साहित्य संमेलन आज कित्येक वर्षे करीत आलेलें आहे. घटकराज्यांची पुनर्रचना करतांना भारत सरकारने या धोरणाचा बव्हंशीं अवलंब केला आहे याबद्दल या संमेलनाला समाधान वाटतें. तसेंच गेलीं कित्येक वर्षे अनेक राज्यांत विभागला गेलेला बहुतेक सलग मराठी प्रदेश एकाच राज्यांत आणला गेला याबद्दलहि या संमेलनाला आनंद वाटतो पण मुंबईसह स्वतंत्र महाराष्ट्राची मागणी मान्य करण्याऐवजी गुजराती व मराठी भाषिकांचें द्वैभाषिक राज्य निर्माण करून सरकारने दोन्ही भाषिकांची कुचंबणा व गैरसोय केलेली आहे. अन्य भाषा–भाषिकांना स्वतंत्र राज्यें देऊन मराठी व गुजराती भाषिकांना तें नाकारण्यांत त्यांच्यासंबंधी अन्याय व पक्षपात झाला आहे याचा या संमेलनाला अत्यंत खेद वाटतो. तसेंच सलग मराठी प्रदेशांपैकी बेळगांव, कारवार, भालकी, संतपूर, उतनूर, बस्तरचा पश्चिमेकडील भाग, वाराशिवणी, संसर, मुलतापी, बऱ्हाणपूर इत्यादि सीमेवरील प्रदेश अद्यापि अन्य भाषिक राज्यांत जनतेच्या इच्छेविरुद्ध घातलेला आहे. या अन्यायाने वरील अन्यायांत आणखी भर टाकून कुचंबणा वाढविण्यास व असंतोष धुमसत ठेवण्यास कारणें दिलेलीं आहेत. सीमाविषयक प्रश्न सोडवितांना पाटसकर–निवाड्यानुसार खेडें हा घटक धरूनच तो सोडवावा, तसेंच गोमंतक हा संयुक्त महाराष्ट्राचा अविभाज्य घटक असल्याने तोहि त्याच्या स्वतंत्रतेनंतर संयुक्त महाराष्ट्रांत सामाविष्ट करावा असें या संमेलनाचें मत आहे. सारांश, आजच्या द्वैभाषिक मुंबई राज्याबद्दल खेद व असंतोष व्यक्त करून हें संमेलन पुन्हा अशी मागणी करीत आहे की, नागपूर करारानुसार मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र ताबडतोब निर्माण करण्यांत यावा. त्याशिवाय या संमेलनाचें कधीहि समाधान होणार नाही किंवा हें संमेलन इतर कोणताहि पर्याय मान्य करणार नाही.

---

अनुक्रमणिका

[ कव्हर पान २ वरून पुढें चालू. ]

**शुद्धलेखनः**—शुद्धलेखन-महामंडळाचे एक खास अधिवेशन रविवार दि. २८ सप्टेंबरला भरणार असून त्यांत गतवर्षी ( २९ सप्टेंबर १९५७ रोजीं ) संमत झालेल्या नियमांचा पुनर्विचार होणार आहे. या अधिवेशनासाठीं संबंधित सर्व विद्यापीठें व महाविद्यालयें यांच्या प्रतिनिधींना आमंत्रणें पाठविलीं आहेत.

**चुकीची दुरुस्ती**—'पत्रिके' च्या गेल्या अंकांतील परीक्षाविषयक वृत्तान्तांत श्री. द. दा. कणेकर हे आचार्य परीक्षेंत पहिले आल्याचें नजरचुकीने छापलें गेलें. त्याऐवजी श्री. मो. स. गोसावी ( सांप्रत, नाशिक येथील कॉमर्स कॉलेजचे प्रिन्सिपल ) पहिले आले आहेत असें समजावें.

---

**पुणें-संमेलन-वृत्तान्तः**—पुणें येथे कै. आचार्य जावडेकर यांच्या अध्यक्षतेने भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाचा वृत्तान्त गतवर्षी छापून प्रसिद्ध झालेला आहे. अनेक प्रतिनिधींकडे तो पाठविण्यांत आलेला आहे. पत्त्यांच्या अभावीं कित्येकांना तो पाठवितां आलेला नाही. तरी ज्या परस्थ प्रतिनिधींना तो हवा असेल त्यांनी तो श्री. वि. त्र्यं. शेटे, वकील, शनिवार पेठ, पुणें २ यांचेकडून मागवावा. पुण्यांतील प्रतिनिधींनीं प्रस्तुत वृतान्त म. सा. प. च्या कार्यालयांतून न्यावा.

---

**साधारण-सभासदांना विनंती**—परिषदेचे नवीन वर्ष सुरू होऊन तीन महिने झाले. घ. नि. ९ ( अ ) प्रमाणें 'साधारण-सभासदांनी प्रत्येक वर्षाच्या पहिल्या तिमाहींत आपली सभासदत्वाची वर्गणी ( ३ रु. ) भरली पाहिजे.' ज्यांनी अद्याप वर्गणी पाठविली नाही त्यांनी ती सत्वर पाठवावी. ज्यांचेकडे मागील वर्गणी थकली आहे त्यांनी थकबाकीसुद्धा चालू वर्षाची वर्गणी पाठविण्याची कृपा करावी.

---

## नवीन सभासद

### तहहयात

१ डॉ. भिवाजी अर्जुन परब, मुंबई.
२ डॉ. श्री. शां. आजगांवकर, मुंबई.
३ श्री. म. र. देशपांडे, कोल्हापूर.
४ श्री. अ. श्री. भवाळकर, मुंबई.
५ श्री. ना. कृ. साठे, पुणें ४.

### साधारण

१ श्री. म. शं. आगरकर, पुणें.
२ श्री. द. दा. कणेकर, ठाणें.
३ श्री. ना. द. नांदुर्डीकर, मुंबई.
४ श्री. म. अ. करकरे, पुणें.
५ श्री. र. वा. सातवळेकर, हुबळी.
६ श्री. गं. र. भडभडे, पुणें.
७ श्री. र. गो. ऊर्फ नाथ चव्हाण, कऱ्हाड.
८ प्रा. म. रा. पारसनीस, मुंबई.
९ डॉ. आनंदप्रकाश दीक्षित, गोरखपूर.
१० श्री. देवीसिंग चौहान, मुंबई.
११ श्री. श्री. शं. दातार, पुणें.
१२ कु. शरदिनी कृष्णराव बाबर, पुणें.
१३ श्री. ना. ज. जाईल, पनवेल.
१४ श्री. के. गो. लिमये, पनवेल.

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-प्रकाशनें

१. मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास ( मानभाव अखेर )
ले-कै. बा. अ. भिडे ( प्रती शिल्लक नाहींत )

२. म. सा. परिषद्-इतिहास
ले. म. म. प्रा. द. वा. पोतदार मूल्य ३ रु.

३. संत वाङ्मयाची सामाजिक फलश्रुति
ले. प्रा. गं. बा. सरदार .... .... मूल्य २ रु.

४. वाङ्मयीन समालोचन ( १९४७ ) ... मूल्य २ रु.

५. शुद्धलेखननियम .... .... .... मूल्य २ आ.

६. वाङ्मयीन वाद ( परिषद्-पुरस्कृत ) .... मूल्य ३ रु.

७. प्राचीन पद्यवेंचे ( प्राज्ञ परीक्षेस लावलेलें ) .... मूल्य २॥ रु.

८. निबंधविकास ( प्राज्ञ परीक्षेस लावलेलें ) ... मूल्य २॥ रु.

९. साहित्यसुगंध ( प्रवेश परीक्षेस लावलेलें ) .... मूल्य २॥ रु.

१०. सारस्वत प्रवेश ( प्रथमा परीक्षेस लावलेलें ) ... मूल्य २॥ रु.

क्र. ७, ८, ९ व १० हीं पुस्तकें सोडून इतर पुस्तकें सभासदांस सवलतीच्या दराने मिळतील. ( टपालखर्च वेगळा )

मागणीस्थळः—चिटणीस, म. सा. परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.

मुद्रकः—म. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, १९८/१७ सदाशिव, पुणें २.
प्रकाशकः—य. दि. पेंढरकर, कार्याध्यक्ष, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.